अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ८४

स्वस्ति श्री वटेशु

# चांगदेव चाळीशी

कृ. ह. देशपांडे

प्रधानसंपादक
**आचार्य श्रीनिवास वरखेडी**
कुलगुरु

संपादक
**आचार्य मधुसूदन पेन्ना**
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग

राष्ट्रहिताय संस्कृतम्

**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)

२०२०

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | – | **स्वस्ति श्री वटेशु चांगदेव चाळीशी** |
| **लेखक** | – | **कृ. ह. देशपांडे** |
| **प्रधानसंपादक** | – | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | – | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन** | – | **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष<br>**प्रो. सरोजा भाटे,** सचिव<br>**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष |
| **संपादक मंडळ** | – | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीणा गानु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | – | **2020** |
| **आवृत्ती** | – | **प्रथम** |
| **मूल्य** | – | **रू. 220/–** |
| **आय.एस.बी.एन.** | – | **978–93–85710–41–4** |
| **मुखपृष्ठ** | – | **श्री. उमेश पाटील** |
| **मुद्रक** | – | **अवधूत ग्राफिक्स ॲण्ड प्रिन्टींग** |
| **प्रकाशक** | – | **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**<br>**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success. My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron

Hon'ble Nitin Gadkari

Minister of Road, Transport & Highways of India

## Patron

Prof. Shrinivasa Varakhedi

Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President

Prof. Gautam Patel

Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary

Prof. Saroja Bhate

Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary

Prof. Penna Madhusudan

Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary

Dr. Harekrishna Agasti

Dr. Kalapini Agasti

Dr. Dinakar Marathe

Dr. Parag Joshi

## Organising Committee

Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek

Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek

Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek

Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek

Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek

Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek

Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek

Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek



Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek

Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

## लेखकाचे दोन शब्द

चांगदेव पासष्टी, हे ओवीबद्ध काव्य ज्ञानदेवांनी चांगदेवांना 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा बोध करून देण्यासाठी रचले होते. ज्ञानेश्वरीचे सार तत्वज्ञानरूपाने अनुभवामृतात उतरले आणि अनुभवामृताचे सार चांगदेव पासष्टीत उतरले अशी पू.विनोबांची धारणा होती. म्हणून चांगदेव पासष्टीतील सारभूत असलेल्या अशा निवडक चाळीस ओव्यांवर त्यांनी अत्यंत सूत्रमय भाषेत तळटीपा लिहिल्या आहेत. त्याला त्यांनी 'चांगदेव चाळीशी' संबोधिले आहे. या तळटीपा लिहितांना त्यांनी अतिशय सखोल व सूक्ष्म चिंतन केले होते. याचा प्रत्यय त्यांच्याच शब्दातून येतो. विनोबा लिहितात.

" चांगदेव चाळीशी
हे ज्ञानदेवांच्या पत्राचे सार
ज्ञानदेवाच्या कृपेने
विन्यास लाभले "

परंधाम, पवनार

२५-१२-१९४७

चांगदेव चाळीशीवर तळटीपा लिहितांना विनोबा ज्ञानदेवांच्या अंतरंगात शिरले होते. प्रत्यक्ष ज्ञानदेवांनीच त्यांना दिलेला हा प्रसाद आहे.

या तळटीपांचा स्वाध्यायासाठी माझ्या कुवतीप्रमाणे उपयोग करून घेण्याचा मी प्रयत्न केला. तथापि, हे माझे स्वैर चिंतन आहे. त्यात जे दोष असतील ते सर्वस्वी माझे आहेत.

चांगदेव चाळीशीकडे पाहण्याची माझी दृष्टी आधुनिक संस्कारांनी प्रभावित आहे त्यामुळे प्रस्तुत चिंतन, परंपरागत विमर्शाशी तंतोतंत जुळेलच असे नाही. काही ठिकाणी विचारांची द्विरुक्ती झाली आहे, याचेही मला भान आहे. हा प्रयास शास्त्रशुद्ध लेखन नसून विचारांना दिलेली मोकळी वाट आहे, हे इथे नमूद करणे आवश्यक आहे.

माझे मित्र डॉ. श्री.पु.हिर्लेकर यांनी माझ्या विनंतीवरून अभिप्राय लिहून दिल्याबद्दल मी त्यांचा उपकृत आहे. माझ्या स्वास्थ्याची तसेच विचारांची धुरा त्यांनी सांभाळली आहे.

ज्ञानसाधु श्री. वासुदेवराव चोरघडे यांनी या चिंतनाला पुरस्कार लिहून मला प्रोत्साहित केले आहे. श्री. प्रसन्न मुजुमदार यांनी श्री मंगेश प्रकाशनातर्फे या पुस्तिकेच्या प्रसिद्धीची बाजू सांभाळली आहे. त्यांचाही मी ऋणी आहे.

ज्ञानदेवांचे परमभक्त व श्रेष्ठ संत श्री शंकर महाराज यांनी माझ्या स्वैर चिंतनाला अशीर्वचन लिहून दिले हा मी चांगदेव पासष्टीचा महिमा समजतो. त्यांच्या चरणी माझे अनेकानेक नमस्कार.

माझे मित्र श्री राम शेवाळकर यांच्या सांगण्यावरून या पुस्तिकेची एक मुद्रित प्रत आळंदीचे श्रेष्ठ चिंतक श्री. किसन महाराज साखरे यांचेकडे अभिप्रायासाठी पाठविली होती. त्यांनी या पुस्तिकेला प्रस्तावना पाठविली त्याबद्दल मी त्यांचा उपकृत आहे. ज्ञानदेवांनी चांगदेवांना पासष्ट ओव्यातून जो बोध दिला, त्याचे त्यांनी सखोल विवेचन केले आहे. श्रद्धावान वाचकाला त्यातून 'चांगदेव पासष्टी' चे मर्म कळू शकते.

**उपक्रमोपसंहारो अभ्यासोऽपूर्वता फलम् ।**
**अर्थवादोपपत्ति च लिङ्गं तात्पर्यनिर्णयम् ।।**

श्री. किसन महाराज साखरे यांनी त्यांच्या प्रस्तावनेत या सहा लिंगाच्या कसोटीवर ज्ञानदेवांचा 'चांगदेव पासष्टी' हा लघुकाय प्रकरणग्रंथ कसा उतरतो हे सप्रमाण दाखविले आहे. त्यांची प्रस्तावना या दृष्टीने अतिशय उद्बोधक अशी आहे.

सदर्हु पुस्तिकेत चांगदेव पासष्टीतील ज्या चाळीस ओव्या विनोबांनी निवडल्या त्यांना त्यांनी स्वत:चा क्रमांक दिला आहे. तो कायम ठेवून मूळ चांगदेव पासष्टीत प्रस्तुत ओव्यांचे जे क्रमांक आहेत ते कंसात दिले आहेत. विनोबांनी ज्या पंचवीस ओव्या गाळल्या आहेत त्यात प्रस्तुत चाळीस ओव्यात आलेला विषय दृष्टांताच्या व विवरणाच्या रूपाने अधिक विस्तारला आहे. या चाळीस ओव्यांचे वैशिष्ट्य ठळकपणे लक्षात यावे म्हणून परिशिष्टात संपूर्ण चांगदेव पासष्टी देण्यात आली आहे.

**कृ. ह. देशपांडे**
नागपूर

## चांगदेव पासष्टीवरील आत्मसंवादात्मक भाष्य :

चांगदेव पासष्टी हा आकाराने लहान पण आशयाच्या दृष्टीने महान असलेला सूत्ररूप ग्रंथ आहे. औपनिषदिक शास्त्रांचा प्रत्यक्ष अनुभव घडवून देणारा हा अपूर्व ग्रंथ आहे. उत्तम शिक्षक किंवा गुरू हा विद्यार्थ्यांची आकलन क्षमता लक्षात घेऊन अभ्यासक्रम ठरवित असतो. सामान्य मुमुक्षूला प्रथमत: चित्तशुद्धीसाठी, स्वधर्मपालन, नित्यकर्म, सद्ग्रंथश्रवणाची दीक्षा आवश्यक असते तर साधनचतुष्टय संपन्न असा साधक असला तर आत्मानात्मविवेकापासून महावाक्यचिंतनापर्यंतचा अभ्यासक्रम आखला जातो. शंकराचार्यांचे प्रकरण ग्रंथ त्याची उदाहरणे आहेत. साधक जर न्यायशास्त्रादिकांचा अभ्यासक असेल तर त्याला शास्त्राच्या परिभाषेत खंडनमंडनादि पद्धतीने तर्कग्राह्य स्वरूपाचे मार्गदर्शन आवश्यक ठरते. थोडक्यात साधकाच्या अधिकारानुसार विषय समजावून देणारा उत्तम शिक्षक किंवा सद्गुरू या संज्ञेला प्राप्त होतो. त्यातही अभिनिवेशरहित स्वतंत्रप्रज्ञ चिंतन केव्हाही परिणामकारक ठरते. चांगदेव पासष्टीवर प्रस्तुत चिंतन या स्वरूपाचे असल्याने सर्वांना लाभकारक ठरणारे आहे.

चांगदेव पासष्टीत उपदेश करणारे आहेत योग्यांचे चक्रवर्ती, ज्ञनियांचे राजे ज्ञानेश्वर महाराज! तर पत्र पाठविणारे आहेत, योगाभ्यासाने अष्टसिद्धी प्राप्त केलेले प्राणसिद्धी, मनोलय, इंद्रियजय मिळविणारे, चौदाशे वर्षे आयुर्मर्यादा लाभलेले योगी चांगदेव महाराज! त्यांनी पाठविलेले पत्रही कोरे आहे. लिहिलेले वाचून उत्तर देणे सुलभ आहे. पण न लिहिलेले वाचणे त्यातही प्रचंड तप:सामर्थ्य योगसिद्धी असलेल्या

अधिकारी व्यक्तीच्या आकलनात कुठली त्रुटी राहू शकते, हे जाणण्यासाठी केवळ सिद्ध, ज्ञानी किंवा योगी असूनही चालणार नाही, तर अंत:करणातील भाव वाचू शकणारा 'सखा' असावा लागतो. ज्ञानदेव हे सर्वच आहेत. ते ज्ञानियांचे राजे आहेत तसेच 'चांगया' 'सखया' म्हणून चांगदेवांना संबोधणारे 'सखा' ही आहेत म्हणून ही पत्र भेट तळहातातळी मिठी देणे' याचा प्रत्यय घडवून देणारी, सर्व भेदांचा निरास करून एकसरी संवित्ती स्तरावरील ऐक्य बोध घडवून देणारी ठरली आहे. चांगदेवाला निर्विकल्प समाधीत देहादि जगताची अप्रतीती होती, परंतु जगत मिथ्यत्वाचा निरास ज्या कल्पित त्रिपुटीमुळे होतो त्याचा बोध घडवून देणे ज्ञानदेवाला आवश्यक वाटले. ज्ञाता-ज्ञान आणि ज्ञेय हा केवळ आभास आहे. जाणणारा आणि जाणले जाणारे यात अभेदच आहे. वृत्तिविशेषामुळे भेद जाणवतात. वृत्तिशून्य स्थितीत कूटस्थ, व्यापक, स्वयंप्रकाश संवित्ती कशी प्रतिष्ठित असते, तेच वटेश्वरसंज्ञक आपले स्वरूप आहे त्या स्वरूपस्थितीचा अनुभव निरतिशय आनंदाचा असतो. त्याचा लाभ व्हावा अशी ज्ञानदेव सदिच्छा व्यक्त करतात.

> चांगया पुढत पुढती । घरा आलिया ज्ञानसंपत्ती
> वेद्य-वेदकत्वाही अतीती । पदी बैसे ।।

ज्ञाता ज्ञेय या भावाच्याही पलीकडे असणारे सच्चिदानंद पद या ज्ञानसंपत्तीने प्राप्त करून त्यावर आरूढ हो अशी सदिच्छा ज्ञानदेवाने व्यक्त केली. सर्वभेदांचा निरास करणारी आत्मजागृती ज्ञानदेवाने चांगदेवाच्या या पत्राच्या निमित्ताने सर्वांनाच करून दिली आहे. या पासष्टीतील नेमका आशय सर्वस्तरांतील साधकापर्यंत सुलभतेने पोचविणे हे अत्यंत अवघड असे कार्य अत्यंत सफलतेने श्री.कृष्णराव देशपांडे यांनी या बावीस लघुनिबंधातून केले आहे. चांगदेव पासष्टीवरील त्यांचे हे अप्रतिम भाष्य आहे. या ग्रंथावर उपलब्ध असलेल्या भाष्यग्रंथात, सहज आणि स्वतंत्रप्रज्ञ असलेल्या प्रस्तुत आत्मसंवादात्मक

चिंतनाचे स्थान अग्रगण्य ठरणारे असल्याने सर्व अभ्यासकांना ते स्वागतार्ह ठरेल यात संदेह नाही. श्री.कृ.ह. देशपांडे यांचा उपनिषदांचा दांडगा व्यासंग, शंकराचार्यांच्या उपनिषद भाष्यांचा नित्य अभ्यास, जे कृष्णमूर्ती, विनोबा भावे यांच्या विचारांचे सखोल चिंतन, आणि कायद्याच्या अभ्यासातून प्राप्त झालेली, कुठल्याही विषयाचा सूक्ष्म वेध घेण्याची त्यांची सहजप्रवृत्ती यातून हे आत्मसंवादात्मक भाष्य सिद्ध झालेले आहे हा ज्ञाननिधी सर्वांपर्यंत पोचावा या कळवळयाने झालेली ही अभिव्यक्ती आहे. त्यांचा गीतार्थबोध हा भगवद्गीतेवरील ग्रंथ नुकताच प्रसिद्ध झालेला आहे. उपनिषदावरील त्यांचे चिंतन प्रकाशनासाठी सिद्ध आहे. त्यातील विचारांच्या स्पष्टतेसाठी क्वचित प्रसंगी त्यांना पारंपारिक शब्द योजना करावी लागली असेल. परंतु या ग्रंथातील गहन विचार मात्र कृष्णरावांनी सहजतेने, सुबोध पद्धतीने त्यामागील विज्ञानासह, आवश्यक त्याच ठिकाणी उपनिषदांतील समर्पक प्रमाणांसह उलगडून दाखविले आहे. जणू स्वत:च स्वत:ला समजावून सांगितलेली ही रहस्ये असल्याने, त्यांचे हे चिंतन अंत:करणाला भिडणारे झाले आहे. सोबत विनोबांच्या चांगदेव-चाळीशीतील तळटीपांचे स्पष्टीकरण यात आलेले आहे. विनोबांची चांगदेव-चाळीशी हे केवळ पासष्टीचे साररूप नाही तर त्या ग्रंथाकडे पाहण्याची सूक्ष्म दृष्टी देणारी आहे. त्यातील तळटीपा ह्या कोणत्याही भाष्याहून अधिक बोलक्या आहेत. त्याचेही यथार्थदर्शन श्री.कृष्णरावांनी यातून समर्पकरीतीने घडवून दिलेले आहे. ज्ञानोबा आणि विनोबा यांच्या चिंतनातील अभेद दर्शनासह अत्यंत सुबोध आणि धारावाही या आत्मसंवादात्मक भाष्य लेखनासाठी श्री.कृष्णराव देशपांडे यांचे हार्दिक अभिनंदन आणि त्यांच्या हातून उत्तरोत्तर सारग्राही लेखन व्हावे यासाठी शुभेच्छा.

-

**वासुदेव गोविंद चोरघडे**

१६२, 'शिवकृपा', अभ्यंकरनगर,
नागपूर.

# पुरस्कार

माझे स्नेही नागपूरचे ॲड्व्होकेट कृ. ह. देशपांडे हे व्यवसायाने वकील आहेत. भारतीय तत्वज्ञान, श्रीमदाद्यशंकराचार्यप्रभृतींचे ब्रह्मविद्याविषयक विवेचन, तसेच, अर्वाचीन थोर विचारवंत श्री. विनोबाजी भावे यांचे भगवद्‌गीता, उपनिषदे एतत्संबंधी विचार यांचा त्यांनी अभ्यास केला आहे.

काही ग्रथांना प्रस्तावनेची वा पुरस्काराची आवश्यकताच नसते. 'स्वयमेव मृगेंद्रता' या सदुक्तीप्रमाणें ते स्वयंप्रकाशी, स्वप्रत्ययनेय असतात. श्री. कृष्णराव देशपांडे यांचे ग्रंथ याच कोटीतील आहेत. त्यांच्या निखळ स्नेहाखातरच पुरस्काराचा हा प्रपंच राहवत नाही म्हणून.

''**श्रीगीतार्थ बोध**' या त्यांच्या आधीच्या अभ्यासपूर्ण ग्रंथावरून त्यांच्या अध्ययनाची उंची ध्यानात येते.

**ईशावास्यादि उपनिषदे** आणि **चांगदेवपासष्टी** या दोन ग्रंथांविषयी त्यांनी आपले व्यासंगपूर्ण अध्ययन आता प्रकट केले आहे. अन्यान्य **उपनिषदांतील** मृत्युविषयक विचारांचा त्यांनी सादर केलेला आलेख या दृष्टीने पाहण्यासारखा आहे.

**चांगदेव पासष्टी** हा ग्रंथ आकाराने लहान चौदाशे वर्षांचे प्रदीर्घ आयुर्मान असणारा आणि तंत्रविद्या, हठयोग, जारणमारणादि गोष्टी करतलामलकवत् ज्ञात असूनही आत्मज्ञानाची ओळख ज्याला ज्ञानेशांच्या धाकट्या बहिणीकडून - मुक्ताईकडून - करून घ्यावी लागली. त्याचे गर्वहरणही त्यामुळे अनायास झाले. हे सर्व विवेचन

श्री. कृष्णराव देशपांडे यांनी बहारदार केले आहे. ते प्रत्ययपूर्ण वाटते.

श्री. कृष्णराव देशपांडे यांची प्रकृती सध्या असावी तशी बरी नसते. त्यामुळे त्यांची व्यग्रताही कमी नाही. तथापि, अशाही स्थितीत त्यांनी चालविलेला हा महदुद्योग चांगलाच प्रशंसनीय होय, यात तिळमाही संशय नाही.

'अध्यात्मविद्या विद्यानाम् ' असे ज्याबद्दल म्हटले जाते. तो आत्मा आणि त्याचे अध्ययन हा विषय महान आहे, अनंत आहे. त्याचे आयामही पुष्कळ आहेत. श्री. कृष्णराव देशपांडे यांच्याकडून हे अध्ययन अधिकाधिक होवो आणि त्यांची प्रकृतीही त्यासाठी निरामय होवो, हीच अंती त्या जगन्नियंत्याच्या चरणी प्रार्थना.

मिति
२२.०३.२००७

**श्रीनिवास पुरूषोत्तम हिर्लेकर**
गांधी चौक, अमरावती.
दूरध्वनी - २६७५३२५

।। श्री गणेशाय नमः ।।

# ।। श्री चांगदेवपासष्टी विवरण ।।

## ।। श्री ज्ञानेश्वर महाराजांचे वैशिष्टय ।।

संपूर्ण जगभर फिरुन, त्यांनी स्वतः गुरुत्वाचा झेडा मिरवून, योगसामर्थ्याने सर्वांकडून जगमान्यता मिळविली, अशा चांगदेवासारख्या थोर योग्यास, ज्याचेपुढे नतमस्तक व्हावे लागले ते ज्ञानेश्वर महाराज किती थोर असतील याचा विचार करणे आपल्या बुद्धीच्या आटोक्याबाहेरचे आहे. श्री ज्ञानेश्वर महाराजांचे वर्णन केले नाही असा एकही साधू झाला नाही. आणि त्यांना एवढे महत्व लाभण्याचे कारण एकतर मूळातच ते अवतारी असून त्यांचे ठिकाणी अगाध वेदनिष्ठा, अप्रतीम ज्ञानेश्वैर्य,योगसामर्थ्य आणि सर्व वैष्णवात अग्रणी म्हणून वारकरी संप्रदायातील संतांनीच नव्हे, तर यावत् सर्व संतांनी त्यांना प्रामुख्याने स्थान दिलेले आहे. या अनेक गुणांबरोबरच त्यांची कवित्वशैली तर फारच आगळी होती. त्यांच्या कोणत्याही काव्यामध्ये उपमा, भाषासौदर्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, भक्ती व अद्वैत यांची सांगड, अलौकिक साहित्याने भरलेली अलंकारिक उत्प्रेक्षा, आणि अलोट वाङ्माधुर्य, या सर्व गुणांचे संमिश्रण झालेले पहावयास मिळते. अशा प्रतिभासंपन्न ज्ञानेश्वर महाराजांच्या अनेक काव्यग्रंथापैकीच ज्ञानेश्वरी, अनुभवामृतादि ग्रंथाप्रमाणे चांगदेवास पासष्ट ओव्यांनी पाठविलेले उपदेशपत्र अलौकिक असे आहे.

निवृत्तिनाथांच्या सांगण्यावरून, ज्ञानेश्वर महाराजांनी अनुभवामृत आणि चांगदेवपासष्टी हे दोन ग्रंथ, आपला अनुभव व्यक्त करण्याकरिता केले आहेत. अगदी जन्मभर अभ्यास करुनही ज्यांचा अभ्यास पूर्ण होत नाही व जे प्रत्येक वाचनाच्यावेळी विचारवंताना नवा आनंद देऊ शकतात, अशा पासष्टी ग्रंथातील भाषापद्धती अधिक सखोल असुन सूत्रप्राय अशी आहे. थोडक्या अक्षरांत अधिक अर्थ-गांभीर्यता कशी असावी हे दाखविण्याकरिता प्रौढ अक्षरे गुंफुन चांगदेव पासष्टी ग्रंथ जगापुढे आदर्शभूत करून ठेवला आहे. शिवाय, या ग्रंथातून ज्यांना उपदेश करावयाचा होता ते निर्विकल्प समाधीपर्यंत योगाभ्यास केलेले सर्वोत्कृष्ट अधिकारी चांगदेव असल्यामुळे, त्यांना थोडया शब्दाने उपदेश करुनही काम भागेल, असे मनांत गृहीत धरुन, चांगदेवांनी पाठविलेल्या कोऱ्या कागदावर उत्तरादाखल, कठीण अक्षरांची योजना करून फक्त पासष्ट ओव्या लिहून पाठविल्या. असा हा चांगदेव पासष्टी ग्रंथ!

या ग्रंथावर ज्येष्ठ विधिज्ञ श्री.कृष्णराव देशपांडे यांनी बरेच परिश्रम करून, तो विवरणात्मक पद्धती प्रमाणे सादर केला आहे. त्याचप्रमाणे त्यांची धर्मनिष्ठा, भगवन्निष्ठा, गुरुनिष्ठा, वाढो. त्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त होऊन, त्यांच्याकडून आणखीही उपयुक्त पुस्तके प्रसिद्ध होवोत, ही श्रीपांडुरंग चरणी प्रार्थना आहे.

परमहंस श्री संत शंकर महाराज
श्री क्षेत्र पिंपळखुटा
१ जुन २००७

# प्रस्तावना

'चांगदेव पासष्टी' हा 'लघु काय' तरीहि 'बुह्वर्थ-संपन्न' असा चिमुकला ग्रंथ आहे. मी या ग्रंथावर ''चांगदेव पासष्टी भावोन्मेष'' नांवाचा १७८ पानांचा ग्रंथ प्रकाशित केला आहे.

''चांगदेव' हा युञ्जान योगी' होता. योगाभ्यासामुळे. 'त्वम्' पदार्थाची शुद्धी केलेला उत्तम अधिकारी होता. म्हणून 'तत् -पदाच्या' वा तत् -पदार्थाच्या शुद्धीपासून 'चांगदेव पासष्टी' ची सुरुवात केली आहे. त्यास फक्त 'महावाक्या' - चाच उपदेश करावयाचा होता. म्हणून पहिल्या ओवीत ''आशीर्वादरुप-मंगलाचरण'' करून, आशीर्वाद देऊन, पहिल्यानदा तीन ओव्यांमधून परब्रह्माचे 'तटस्थ-लक्षण' सांगून ग्रंथास प्रारंभ करतात-

स्वस्ति श्री वटेशु । जो लपोनि जगदाभासु

दावी, मग ग्रासु। प्रगटला करी ।।१।।

याचा सरलार्थ असा की, हे श्री वटेश! हे चांगदेवा! तुझे कल्याण असो! जो परमात्मा आपण स्वत: विशेषरूपेकरून लपून जगताचा आभास दाखवितो. मग-तत्वज्ञानानंतर तो प्रगट - विशेषरूपेकरून अभिव्यक्त झाला असता, जगद्रूप अर्थाध्यासाचा व त्याचे ज्ञानरूप - ज्ञानाध्यासाचा ग्रास-बाध करून टाकतो.

आता शब्दाला अर्थांचे वा अर्थछटांचे ओझे होत नसते.

श्रीज्ञानेश्वर महाराज आपल्या शब्दांचे सामर्थ्य व त्यांचे व्यापकपण सांगतांना ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांतील एकवीसावी ओवी, ती अशी-

तैसें शब्दांचे व्यापकपण। देखिजे असाधारण।

..... भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे ।। ६-२१-ज्ञा.।।

''चांगदेव-पासष्टी'' म्हणजे युक्तयोगी-योग्यांची माउली असलेल्या 'श्री ज्ञानदेवांनी' युञ्जान योगी असलेला चांगदेव नावाच्या अधिकाऱ्यास केलेला 'ब्रह्मात्मैक्य-बोध'' आहे. तसेच युञ्जान योगी चांगदेवाने पाठविलेल्या कोऱ्या पत्रास युक्तयोग्यास अर्थात् 'कोऱ्या' म्हणजे 'त्वम्' पदाची व 'त्वम्' पदार्थाची शुद्धी केलेल्या उत्तम अधिकाऱ्यास, मंगल-शब्दांचा-स्वस्तिश्री-शब्दाचा उल्लेख करून, ''इतर-भाग-कोरा'' असलेल्या पत्रास युक्तयोगी श्री ज्ञानदेवांनी लिहिलेले हे उत्तर आहे; अर्थात् हा एक एकांगी ''सुखसंवाद'' किंवा सन्मित्र-संवाद' आहे. युञ्जान योगी चांगदेवाचे कोरे पत्र वाचण्यासाठी युक्तयोगी श्री ज्ञानदेवच असावयास हवेत, तसें लिहिलेले पत्र कोण्याही साक्षरास वाचता येते; पण 'कोरे-पत्र' वाचणे हे एक अद्‌भुत नवलच आहे. एक प्रकारची नाटयछटा आहे. ही ''पासष्टी'' सर्वांसाठी आहे. श्री ज्ञानदेव हे 'युक्तयोगी' तर 'श्री चांगदेव' हे 'युञ्जान-योगी' होते. अर्थात् एका 'युक्त-योगी' पुरुषानें दुसऱ्या युञ्जान योगी पुरुषास सांगितलेला ''प्रातिभ-ब्रह्मात्मैक्य-बोध'' आहे.

चांगदेव पासष्टीतील विषयांची -अनुक्रमणिका थोडक्यांत द्यावयाची झाली तर ती पुढील प्रमाणें देता येईल.

चांगदेव पासष्टीतील विषयानुक्रमणिका

## वर्णक पहिले

ओवी १ ते ३६ वटेश्वर = आत्म्याचे-शुद्ध त्वम् -पदार्थाचे वर्णन, तसेच शुद्ध तत् पदार्थाचें वर्णन, ३७-सदतीसाव्या ओवींत महावाक्याचा उपदेश केला आहे. 'तत्वमसि' या महावाक्यार्थाचा उपदेश केला आहे.

'तत्वमसि' या महवाक्याचा उपदेश केला आहे. 'तत्वमसि' या महावाक्यांत 'तत्' 'त्वम्' आणि 'असि', अशी तीन पदे आहेत. त्यात 'तत्' पदाचा वाच्यार्थ 'ईश्वर' आहे; अर्थात् 'तत् -पद-वाच्य' सर्वज्ञ, सर्वशक्ति, सर्व नियामक, जगत्क किंवा वैकुंठाधिपति महाविष्णु सर्वभूत-महेश्वर, हा आहे. असे वेदशास्त्र-पुराण-वचनांवरून आढळात येते आणि सत् - चित् - आनंदरूप, सत्ता-प्रकाश-सुखरूप 'ब्रह्मचैतन्य' हे त्या 'तत्' पदाचा लक्ष्यार्थ आहे.

तसेच 'त्वम्' पदाचा वाच्यार्थ अन्तःकरण विशिष्ट जीव, कर्ता-भोक्ता, ज्ञाता, 'मी मी' या रूपानें ज्याचे ज्ञान होते, जो जागृदादी अवस्थावान् अल्पज्ञ, अल्पशक्तिमान् जीव चैतन्य आहे आणि आत्मा, सच्चिदानंद कूटस्थ चैतन्य हे 'त्वम्' पदाचे लक्ष्यार्थ आहे.

तसेच 'असि' पदाने -जीव आणि ईश्वर यांचे ऐक्य प्रतिपादिले आहे. जीवेश्वरांचे वाच्यार्थांत, विशिष्ट स्वरूपांत विरुद्ध धर्मांमुळे वा विरुद्ध विशेषण वा उपाधीमुळे ते ऐक्य मुळीही संभवत नाही. त्यामुळे जीव आणि ईश्वर या दोघांच्या उपाधींचा व उपाधिसंबंधी विरुद्ध धर्मांचा त्याग करून, जीवाधिष्ठान 'आत्मा' आणि ईश्वराधिष्ठान विशुद्ध ब्रह्मचैतन्य, या लक्ष्यार्थांत त्यांचे ऐक्य आहे. त्या एकच एक असलेल्या लक्ष्य चैतन्याचा "तत्वमसि" या महावाक्याचा 'लक्षणावृत्तिरूप ' संबंध आहे. म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज चांगदेवाला या 'तत्वमसि' - महावाक्यार्थ्याचा उपदेश करून, 'पूर्ण ऐक्यस्थिति' सांगतात-

तया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा ।
चांगया, मज तुज आपणयाचा । बोले ऐके ॥३७॥

यातील शब्दार्थ : वटेश्वराचा पुत्र - सच्चिदानंद ब्रह्माचा अंशः, रवा - कण, अंश. मज-तुज-माझ्या व तुझ्यामध्ये (आत्मैक्य, पूर्ण एकत्व); आपणयाच = आपलेपणाचा, अभेदाचा, ऐक्याचा, बोल ऐके = बोल (सिद्ध ऐक्याचे सहज बोलणे, सिद्धानुवाद) ऐक.

अन्वय : हे चांगया ! तया वटेश्वराचा तू पुत्र (आहेस), जैसा कापुराचा रवा; (आतां) मज-तुज आपणयाचा बोल ऐके ॥३७॥

सरलार्थ : हे चांगदेवा ! त्या वटेश्वराचा - परमेश्वराचाच पुत्र म्हणजे अंश आहेस. जसा कापराचा रवा-कण, कापूररूपच असतो, तसा तूं परमात्मरूपच आहेस. आतां माझ्यामध्ये आणि तुझ्यामध्ये अनादि-सिद्ध असलेल्या आत्मैक्याविषयीचा बोल-त्याविषयीचा संवाद, त्यासंबंधीचे जे सहज बोलणे आहे, ते ऐक.॥३७॥

भावोन्मेष : 'तू तया वटेश्वराचा पुत्र' - यांत ''अमृतस्य पुत्राः'' किंवा ''आत्मा वै पुत्र नामासि'' या उपनिषद् वचनांचे प्रतिध्वनि उमटलें असल्याचे आढळांत येते. 'वटेश्वराचा पुत्र' म्हणजे सच्चिदानंद ब्रह्माचा 'अंश' म्हणून श्री ज्ञानेश्वर महाराजांनी चांगदेवास संबोधिले आहे.

भावनिक क्षेत्रांतील प्रेमलक्षण-भक्तिसाधनेच्या दृष्टीने पाहिले तर-परमेश्वराची सर्वही जीव, पुत्र-लेकरे आहेत, पण जो विशेष मुमुक्षु-जिज्ञासु भक्त असतो, तो परमेश्वराचा पुत्र म्हणजे लाडका, आवडता भक्त असतो, असाही यांतील भाव आहे. जे ज्ञानी भक्त आहेत. त्यांना तर ''ज्ञानी त्वात्मैव मे मतम्'' -७-१८ ज्ञानी भक्तास तर मी आपला 'आत्मा' मानतो, किंवा 'भक्तास्तेऽतीव मे प्रियाः' ज्ञानोत्तर प्रेमलक्षणात्मक भक्ती करणारे भक्त तर मला अत्यंत प्रिय आहेत, असे श्री भगवंतांनी

म्हटले आहे, तोच आशय ''तया वटेश्वराचा तूं पुत्र आहेस,'' या वाक्यात व्यक्त झाला आहे.

'पुत्र' म्हटले तर तो पित्याहून वेगळा-स्वतंत्र अस्तित्त्वाने राहात असतो; पण तसा स्वतंत्र अस्तित्वाचा वा अंश-अंशीभावाचाही 'भेद' येथे नाही. कापुरांत कापुराचा कण जसा एकरूप कापुरच असतो; तसा तूं ब्रह्माशी सदाचाच एकरूप आहेस, असा विशेष आशयही व्यक्त केला आहे.

''मज-तुज'' ही एकेरी भाषा-ऐकरी बोलणें आहे. ही सलगीची म्हणजे श्रेष्ठ-कनिष्ठ भावरहित, समभावाची भाषा आहे. श्रेष्ठ-कनिष्ठ-भावात्मक भेदामुळेच चांगदेवास पुत्राचाच साधा 'मायना' ही लिहिता आला नाही. यातील सूक्ष्म चिंतन असे की, ''मी-माझे'' हा भाव, ''मी मनुष्य आहे.'', हे विशेष-भ्रमज्ञान, हे ''स्थूल देह तादात्म्य भ्रांती'' मुळे होते; ''मी ज्ञाता, कर्ता, भोक्ता आहे.'' हे विशेष भ्रमज्ञान हे ''सूक्ष्मदेहाच्या तादात्म्य भ्रांतीने'' होते, आणि ''मी श्रेष्ठ आहे तर इतर कनिष्ठ आहेत.' हे व या सम श्रेष्ठ-कनिष्ठ भावाचे ज्ञान ''कारण-देहाच्या तादात्म्य-भ्रांतींने'' होते या ओवीतील ''मज-तुज'' हा एकेरी उद्‌गार, हा कारण-देह तादात्म्यभ्रान्तिजनित'' श्रेष्ठ-कनिष्ठ भावरहितते'' चा द्योतक आहे.

## संक्षिप्त अनुक्रमणिका

ओवी ३८ ते ६० महावाक्याने होणारे 'अखंडार्थत्वाचे ज्ञान (भेटीचे वर्णन) ६१ ते ६५ श्रीमन्निवृत्ति नाथांनी दिलेल्या फलांचे वर्णन.

आता दुसऱ्या पद्धतीने चांगदेव-पासष्टी अनुक्रमणिका.

| ओव्या | विषय |
|---|---|
| १ ते ३ | अध्यस्ताचा अधिष्ठानाशी वैर-प्रतिबध्य-प्रतिबंधक-भाव संबंध |
| ४ ते ७ | अध्यस्ताच्या उत्पत्तीने, भासण्याने, क्रियेने -गुणाने-दोषाने ''अधिष्ठानांत यत् किंचित हि उणेपणा, झीज वा वाढ मुळीही येत नाही.'' |
| ८ ते १५ | अध्यस्त रूपाने अधिष्ठानच भासते. |
| १६ ते २१ | अविद्येत क्षोभ होऊन परमात्माच विवर्तोपान रूपाने त्रिपुटी बनतो. |
| २२ ते २९ | त्रिपुटी असो-नसो 'परब्रह्म' 'जसा' च्या 'तसाच' आहे त्याचा ''अन्वय आणि त्रिपुटीचा ''व्यतिरेक''. |
| ३० ते ३६ | परमात्म्याचे स्वरूप लक्षण. (तो परब्रह्म-परमात्मा शब्दाला, ज्ञानाला विषय न होता, सत्-चित-आनंद-अद्वयरूप आहे.) |
| ३७ | महावाक्य - उपदेश |
| ३८ ते ६० | तुझ्या माझ्यामधील एकत्त्वाचे वर्णन व ह्याचा अनुभव घ्यावा, असा आशीर्वाद आणि फल. |
| ६१ ते ६५ | 'ताजा कलम' घालून श्रीमन्निवृत्तिनाथांच्या कृपेचे |

वर्णन.

मा. श्री. कृ.ह. देशपांडे यांनी ''चांगदेव चाळीशी'' हा ग्रंथ लिहिला. ब्र.भू. विनोबा भावे यांची ''चांगदेव-चाळीशी'' या नावांने हा ग्रंथ लिहिला त्याचे हे विवरण वाचले. एकूण हा ग्रंथ ६९-एकोणसत्तर पानांचा आहे. श्री ज्ञानेश्वरमहाराजांच्या 'चांगदेव-पासष्टी' मधील निवडक चाळीस ओव्यांवर ब्र.भू. विनोबांनी चिंतनपर वृत्ती लिहिली आहे. आता मा.श्री.कृ.ह.देशपांडे यांनी 'चांगदेव-चाळीशी' हा ग्रंथ चिंतनात्मक लिहिला आहे. या ग्रंथांत एकूण लहान लहान बावीस प्रकरणें लिहिली आहेत.

श्री. कृ. ह. देशपांडे यांनी केलेले विवेचन अभ्यासकास उपयुक्त होणारे आहे. विचाराची दिशा दाखविणारा उपयुक्त ग्रंथ आहे. या ग्रंथाच्या वाचनाने अभ्यासकाचा अंतरंगात प्रवेश होऊन, तत्त्वसाक्षात्कारापर्यंत सांगाती होणारा असा ग्रंथ आहे.

परमार्थाची वाटचाल करणाऱ्या साधकास या ग्रंथाचा चांगलाच उपयोग होईल. त्यास यथार्थ बोध होईल. तसा सर्व मानवास बोध होवो ! ही श्रीज्ञानराज माऊलीचे चरणी प्रार्थना!

किसन महाराज साखरे
साधकाश्रम, आळंदी देवाची,
जि. पुणे.

# अनुक्रमणिका

# १. स्वस्ति श्री वटेशु

श्रीज्ञानदेवांची ओळख मराठी भाषिकांना करून देणे म्हणजे सूर्याला पणती दाखविण्यासारखे होईल. ज्ञानदेवांचे मराठी भाषेवर अनन्य उपकार आहेत. भगवद्गीतेवरील ज्ञानेश्वरी किंवा भावार्थ दीपिका, अद्वैत तत्वज्ञानावरील 'अनुभवामृत', 'तत्वमसि' या महावाक्याचा बोध करून देणारी 'चांगदेव पासष्टी' आणि भक्तिरसाने ओथंबलेली भजने' हे सर्व वाङ्मय अक्षर-ब्रह्म आहे.

विनोबांनी 'चांगदेव पासष्टी' मधील निवडक चाळीस ओव्यांवर चिंतनपर वृत्ती लिहिली आहे. ईशावास्योपनिषदावर त्यांनी लिहिलेल्या वृत्ती प्रमाणे ही देखील सूत्रमय आहे. त्यातील एकेका शब्दात गहन अर्थ भरला आहे. श्रीदादामहाराज साखरे यांची सार्थ 'चांगदेव पासष्टी' फार पूर्वी प्रसिद्ध झाली होती. त्यावर श्री किसन महाराज साखरे यांनी 'भावोन्मेष' लिहिला असून त्याची तिसरी आवृत्ती अलीकडे प्रसिद्ध झाली आहे. श्रीक्षेत्र पावसच्या स्वामी स्वरूपानंदाचे उत्तराधिकारी, स्वामी माधवनाथ माहाराज यांनी पुणे येथे १९८३ ते १९८६ पर्यंत आपल्या रसाळ वाणीने 'चांगदेव पासष्टी' वर जी प्रवचने दिली होती ती पुस्तकरूपाने स्वामी माधवनाथ बोध प्रसारक मंडळाने १९९१ मध्ये प्रसिद्ध केली.

'चांगदेव पासष्टी' हा ओवीबद्ध ग्रंथ ज्ञानदेवांनी चांगदेवाच्या

कोऱ्या पत्राला उत्तरादाखल लिहिला आहे. चांगदेव सिद्धयोगी होते.

ज्ञानदेवांनी रेडयाच्या मुखातून पैठणक्षेत्री ऋग्वेद वदविल्याची वार्ता त्यांच्या कानावर पडल्यानंतर आपण प्रत्यक्ष त्यांना भेटावे असा त्यांनी संकल्प केला. परंतु भेटीपूर्वी ज्ञानदेवांशी पत्राद्वारे संपर्क साधावा असा त्यांचा मानस झाला. ज्ञानदेव आपल्यापेक्षा वयानी लहान पण ज्ञानाने वडील असल्यामुळे त्यांना 'चिरंजीव' म्हणावे की, 'तीर्थस्वरूप' असा त्यांच्या मनात गोंधळ निर्माण झाला असा एक समज आहे. त्यांनी जो कोरा कागद पत्र लिहिण्यासाठी घेतला तो तसाचा तसाच आपल्या शिष्याच्या मार्फत ज्ञानदेवांकडे पाठविला. तो कोरा कागद पाहून ज्ञानदेवांना चांगदेवांच्या मनातील खळबळीची कल्पना आली आणि त्यांना उद्देशून पासष्ट ओव्यांचे पत्र पाठविले ते 'चांगदेव पासष्टी' म्हणून प्रसिद्ध आहे.

चांगदेव स्वत: विद्वान् होते आणि योगीही होते. त्यांनी सर्व वेदांचा व वेदांगांचा, अभ्यास केला होता. ते भाषाविद् होते. तसेच योगाभ्यासाने त्यांनी अनेक सिद्धी प्राप्त केल्या होत्या. त्यांचा लौकिक सर्वत्र पसरलेला होता. त्यांना मानणारे व त्यांचा अनुग्रह प्राप्त करून घेणारे अनेक विद्वान होते. त्यांचा शिष्यपरिवार फार मोठा होता. अशा सिद्ध पुरूषाने ज्ञानदेवासारख्या पोरसवदा इसमाकडे भेटीला जावे हा एक अद्‌भुत प्रसंग होता. त्याबद्दलचे विशेष कुतुहल त्यावेळी उत्पन्न झाले असेल तर त्यात नवल काहीच नाही.

'चांगदेव पासष्टी' मधून ज्ञानदेवांचा प्रतिभासंपन्न व करूणामय वाग्विलास प्रतीत होतो. चांगदेवांच्या श्रेष्ठत्वाचा गौरव कायम ठेवून आत्मज्ञानाचे जे बोधामृत केवळ ६५ ओव्यातून स्त्रवले आहे ते खरोखरीच एका अनिर्वचनीय अशा स्वात्मानुभूतीची साक्ष आहे.

' स्वस्ति श्री वटेशु । जो लपौनि जगदाभासु ।
दावी, मग ग्रासु । प्रगटला करी ॥

# २. प्रगटला न लपला न खोमता जो

'स्वस्ति श्री वटेशु । जो लपोनि जगदाभासु ।
दावी, मग ग्रासु। प्रटला करी ।।१ (१)

प्रगटे तंव तंव न दिसे । लपे तंव तंव आभासे
प्रगट ना लपला असे । न खोमतां जो ।।२ (२)

बहु जंव जंव होये । तंव तंव कांहीं चि न होये ।
काही न हौनि आहे । आघवा चि जो ।।३ (३)

(श्री वटेशु 'स्वस्ति' म्हणजे कल्याण असो. जेव्हा तू लपला असतोस तेव्हा जगाचा आभास होतो, परंतु जेव्हा तू प्रगट होतोस तेव्हा जगदाभास झाकला जातो. तू प्रगट झालास की, दुसरे काही दिसत नाही आणि तू लपतोस तेव्हा हे सारे भासते. तुझ्या लपण्यामुळे किंवा प्रगट होण्यामुळे तुझ्या मूळ स्वरूपात कुठलाही कमीपणा किंवा ऱ्हास घडून येत नाही. तू जेव्हा वाढलेला भासतो तेव्हा तुझ्यात स्वरूपत: बदल होत नाही. जेव्हा तू काहीच झालेला भासत नाही तेव्हाही तू स्वरूपत: संपूर्ण असतो.)

श्री वटेशु हे चांगदेवाच्या गुरूचे नाव! पुढच्या एका ओवीत 'तेया पुत्र तूं वटेश्वराचा' असा उल्लेख आहे. गुरूच्या नावाने शिष्याला संबोधण्याचा प्रघात आहे. ज्ञानदेवांनी आपल्या गुरूपरंपरेचा ज्ञानेश्वरीत

गौरवपूर्वक निर्देश केला आहे.

चांगदेवांनी कोरा कागद पाठविला याचे मर्म ज्ञानेशांना कळले होते. जागृतीमध्ये सर्व विश्व प्रतीत होते पण निर्विकल्प समाधीत त्याचा लोप होतो म्हणजे ते दिसते नाही त्यावेळी 'मी' पणा सुद्धा राहत नाही. असते ती केवळ निरालंब आनंदावस्था ! त्या स्थितीचे शब्दांकन करता येणे शक्य नसते कारण सर्व शब्द अर्थ प्रगट करण्याकरिता असतात. ज्या स्थितीत ज्ञान आणि अज्ञान यांचा निरास होतो तिचे वर्णन कसे आणि कोण करणार? परंतु त्या स्थितीत चैतन्याचे अनिर्वचनीय प्रभुत्व स्फुरत असते. समाधी उतरल्यावर संपूर्ण विश्व पुन्हा दिसू लागते.

चांगदेव स्वतः सिद्धयोगी होते. जागृती आणि समाधी या दोन्ही अवस्थांची त्यांना अनुभूती होती. त्यांच्यापुढे प्रश्न होता जर जागृतीमध्ये विश्व दिसते आणि समाधीत ते लोप तर या दोन अवस्थांपैकी कोणती खरी समजावयाची ? जागृती आणि समाधी एकाच वेळी घडून येण्याऱ्या अवस्था असू शकत नाहीत.

चांगदेवाच्या मनांत हा जो संभ्रम उत्पन्न झाला होता त्याचे निराकरण करण्यासाठी ज्ञानदेवांनी ६५ ओव्यांचा प्रकरणग्रंथ लिहिला. आत्मा स्व-रूपात प्रगट होतो तेव्हा त्याचे निर्गुण, निराकार असे दर्शन घडते आणि जेव्हा या स्वरूपाची जाण नसते तेव्हा सगुण, साकार विश्वरूप भासते. विश्वाचे रूप एकाच जाणिवेवर प्रतीत होते आणि त्याच जाणिवेवर त्या रूपाचा लोपही प्रत्ययास येतो. एकाच जाणिवेचे निरंतर सुरू असणारे हे स्फुरण आहे. जाणिवेची ही स्पंदने होत असताना तिच्या मूळ स्वरूपात कोणताच बदल घडून येत नाही. ते कमीअधिक होत नाही. जाणिवेची घनता आणि क्षमता अबाधित राहते. न खोमता जो या शब्दांनी जाणिवेचे मूळ अ-क्षर स्वरूप दाखविले आहे.

जगदाभास किंवा त्याचा लोप हा जाणिवेचाच आविर्भाव आहे. जगत् किंवा विश्व आत्म्याहून वेगळे नाही कारण जगाची जाण असेपर्यंतच त्याचा प्रत्यय येतो.

विश्वाचा आभास हा क्षणोक्षणी बदलत असतो, परंतु त्याचा प्रत्यय घेणारी संवित्ती मात्र कायम असते. जड-अजड, चर-अचर, व्यक्त-अव्यक्त या सर्व स्थल -काल-सापेक्ष कल्पना आहेत. त्यांचा आभास ज्या एका नित्य तत्वावर होतो ते तत्व जाणीव आहे. तेच शाश्वत आहे.

जगदाभास लोपला म्हणजे जगाचा नाश घडून येत नाही. तसेच समाधी अवस्थेत ज्या निरूपाधिक आत्मस्वरूपांत प्रतिष्ठा असते ते नव्याने उत्पन्न होत नाही. जागृतीत तेच आत्मतत्व जगताचा स्थूल अनुभव घेते कारण ते प्राप्त करून देणारी इंद्रिये व अंत:करण काम करीत असतात. स्वप्नावस्थेत संवेदना ग्रहण करणारी इंद्रिये स्तब्ध असतात, परंतु वासनांनी लिप्त असलेले अंत:करण जागृत असते. हा अनुभव सूक्ष्म असतो. सुषुप्तीमध्ये सर्व इंद्रिये अंत:करणासह शांत असतात. त्यामुळे आत्मतत्वाचे सुखमय स्वरूप अनुभवले जाते. परंतु त्या अवस्थेत वासनांचा नाश झालेला नसतो. त्या सुप्त असतात. आत्मज्ञानी पुरूष समाधी-अवस्थेत वासना-शून्य असतो. त्यामुळे त्याला मिळणारा आनंद सुषुप्तीच्या तुलनेने वेगळया कोटीत पडतो. आत्मतत्वाची ती निरालंब, आनंदमय अवस्था आहे. या अवस्थाक्रमात आत्मतत्व त्याच्या मूळ स्वरूपात कायम असते. ते प्रगटही होत नाही लोपतही नाही.‘ प्रगटला ना लपला असे । न खोमता जो’ असा त्या आत्मतत्वाचा माहिमा माउलीनी वर्णिला आहे.

चांगदेवांच्या गुरुचा उल्लेख उल्लेख ‘वटेश’ असा केला आहे. ‘वट’ हा शब्द वटवृक्षालाही उद्देशून वापरतात. ‘वट’ म्हणजे प्रगट विश्व । त्याचा ईश म्हणजे नियंता आत्मतत्व आहे. तीच

'संवित्ती' आहे, 'चिती' आहे आणि तिलाच 'जाणीव' (Consciouseess) म्हणतात. तिचे मूळ स्वरूप शाश्वत आहे, स्फुरण पावणारे आहे आणि आनंदमय आहे. तीच जगदाभास दाखवते आणि त्याचा लोपही घडवून आणते. जगत तिच्याहून वेगळे नाही. विश्वात्मैक्य हेच सत्य आहे. 'बहु जंव जंव होये । तंव तंव कांही न हौनि आहे । आघवा चि जो' ।।

⌘❖⌘

# ३. विश्वस्फूर्ति इया झाकवेना

सोनें सोनेपणा उणें । न येता चि झाले लेणे ।
तेंवि न वेचता जग होणे । आंगे जेया ।।४ (४)

कल्लोळ-कंचुक । न फेडितां उघडे उदक ।
तेंवि जगेसी सम्यक् । स्वरूप जो ।। ५ (६)

परमाणूंचिया मांदिया । पृथ्वीपण न वचे चि वाया ।
तेंवि विश्व -स्फूर्ति इया । झाकवेना जो ।। ६ (६)

काळांचेनि पांघुरणें । चंद्रमा हारपो नेणे ।
का वह्नि दीपपणें । आन नोहे ।। ७ (७)

(ज्याप्रमाणे सोनेपणात उणे न येताच सोन्याचे अलंकार होतात त्याचप्रमाणे (आत्म्याच्या) स्वरूपात कोणताही उणेपणा न येता जगाच्या अंगानी तो जग भासवतो. जसे पाण्याचे स्वरूप न बदलता त्यावर लहानमोठे तरंग उठत असतात तसा तो जगरहाटीला सम्यक् -स्वरूप आहे. ज्याप्रमाणे पृथ्वीवरील धूलीकणांचे लोट (मांदिया) उडत असतात पण त्यामुळे पृथ्वीची आश्रयता वाया जात नाही, त्याचप्रमाणे विश्वस्फूर्ती (बहुरूप जगत्) भासमान करीत असली तरी त्याने ती (पूर्णतया) झाकली जात नाही. वेगवेगळया कलांनी चंद्र दिसत असला तरी त्यात तो हारपत नाही. दीपामध्ये उष्णता असते

पण त्यामुळे त्याच्या प्रकाशाची शोभा कमी होत नाही. )

आत्मा स्वरूपत: सत् -चित् - आनंदमय आहे. दृश्य जगत् आणि आत्मा यांचे ऐक्य आहे. जगताच्या आभासालाही आत्माच कारण आहे. जाणणारे आत्मतत्व नसते तर जगत् अमुक प्रकारचे आहे हे कधीच प्रतीत झाले नसते. जे जागृतीत दिसते त्याहून स्वप्नात वेगळया विश्वाचा अनुभव येतो. तो अनुभव त्यावेळेपुरता सत्यच असतो आणि जेव्हा गाढ झोप लागते तेव्हा विश्वाच्या अस्तित्वाची जाण नसते. ही सर्व स्थित्यंतरे ज्या एका तत्वाच्या योगाने जाणवतात तेच तत्व त्या स्थित्यंतरांना आधार आहे. ते एकजिनसी व एकरस आहे. वेगवेगळया अवस्थांच्या आवर्तनाने त्याच्या स्वरूपात कोणताही बदल घडून येत नाही.

सोन्याचे मूळ स्वरूप न बदलता त्याचे अलंकार होतात. त्यामुळे सोनेपणाला विशेष शोभा येते. पाण्याचे द्रवरूप न ढळता त्यावरच लहान मोठे तरंग उठतात. धुळीच्या वावटळी उठतात पण त्यातही पृथ्वीचे आश्रयीस्वरूप कायमच असते. चंद्र कलांचे पांघरूण घेतो पण त्यामुळे तो लपत नाही, उलट अधिक आवडी उत्पन्न करतो.

ज्ञानदेवांनी दिलेले हे दृष्टांत अतिशय बोधकारक आणि मार्मिक आहेत. हे सर्व दृष्टांत आत्म्याच्या चिद्‌विलासाचा निर्देश करतात. अलंकारांनी सुवर्णाची शोभा अधिकच भावते त्याप्रमाणे जगदाभासामुळे आत्मतत्वाची प्रभा दुणावते. विनोबांना एकदा कोणीतरी प्रश्न विचारला, ''तुम्ही रज्जु-सर्पाप्रमाणे विवर्त मानता की सुवर्ण - कंकणाप्रमाणे परिणाम मानता?'' विनोबांनी तात्काळ उत्तर दिले ''मी सुवर्णकंकणाप्रमाणे विवर्त मानतो.'' परिणाम आणि विवर्त हे पारिभाषिक शब्द असून भारतीय तत्वज्ञानातील दोन विचारधारा त्या शब्दांनी लक्षित होतात. सुवर्ण-अलंकार, पाणी-तरंग, पृथ्वी व तिचे कण,

चंद्राच्या कला, दीप -वह्नी ही उदाहरणे परिणामवादात देण्यात आली आहेत. त्यांनी एकमेव आधार तत्त्व निर्देशित होते. परंतु त्या उलट रज्जू-सर्प, रजत-शिंपले, मृगजळ, इत्यादि उदाहरणे विवर्तवादात दिली जातात. विनोबांनी आत्मतत्त्वावर उठणारी आवर्तने सुवर्ण कंकणा प्रमाणे विवर्त म्हणजे आभास मानली आहे. आभास म्हणजे प्रकाशित होणे. प्रगट होणे, नाम-रूपांनी सजणे. जगदाभास हा पूर्णतया मिथ्या नसून एकाच तत्त्वावर भासमान होणारी व सतत बदलणारी नामरूपे आहे. तो नित्य-परिणामी म्हणजे क्षणोक्षणी बदलत आहे. त्याच्या सत्यत्वाचा भास, सापेक्ष म्हणजे त्या स्थलकालापुरता असतो. कोण्या एकेवेळी प्रतीत होणारी वस्तू दुसऱ्या वेळी तशीच असत नाही. हाच विवर्त होय. सोन्याला अलंकाराचा आकार मिळतो, पाण्याला तरंगांचे रूप मिळते. पृथ्वीवरील कण भिन्नत्वाने भासला तरी त्यात पार्थिवता असतेच. चंद्राच्या कलांनी चंद्र विकलित होत नाही. दीपपणामुळे अग्नी नाहीसा होत नाही. या सर्व दृष्टांतांनी आत्मतत्वाची नित्य आधारता निर्देशित होते.

सुवर्ण-कंकणात विवर्त शोधणारी दृष्टी, विनोबांच्या अनुसार, साकारात निराकारता, चंचलत्वात निश्चलता, अंशात समग्रता न्याहाळते आणि अशा निखळ देखणेपणातून निर्विशेष आनंद अनुभवते.

⌘❖⌘

# ४. शिवौनि पृथ्वीवरी

तेंवि शिवौनि पृथ्वी वरी । भासती पदार्थांचिया परी ।।८ (१२)
प्रकाशे ते एकसरी। संवित्ति हे ।।

नाही तें चित्र दाविती । परी असे केवळ भिंती ।।
प्रकाशे ते संवित्ति । जगदाकारें ।।९ (१३)

(शिवा पासून तो पृथ्वी पर्यंत सर्व पदार्थ त्यांच्या स्वरूपाने भासतात. त्यांना प्रकाशित करणारी एकजिनसी संवित्ती आहे. ती स्वयंप्रकाशी आहे.

जे नाही ते चित्र दाखविणारी (त्यांना आधार असणारी) केवळ एक भिंतच असते. तद्वत ही संवित्ती जगताच्या आकाराने प्रकाशित होते.)

प्रत्येक वस्तूत चैतन्याचा अंश असतो. उत्पन्न झालेल्या वस्तूत सतत बदल घडून येत असतो. हा बदल त्यांत अंगभूत असणाऱ्या ऊर्जेचाच विलास आहे. जन्म-स्थिति-मृत्यू हे ह्या परिवर्तनाचे दृश्य स्वरूप आहे. ही ऊर्जा अनेक प्रकारे स्फुरण पावते. ज्ञातृत्व - शक्ती ही त्याच ऊर्जेचे वेगळे रूप आहे. यालाच ज्ञानदेव चिद्-विलास म्हणतात. सर्व जीवनाला व वस्तुमात्रांना आधारभूत असलेले ते सत् -चित् -आनंद स्वरूप, ब्रह्मच आहे. हा सिद्धांत ज्ञानदेवांनी चिद् - विलासाच्या संकल्पनेतुन व्यक्त केला आहे.

'ज्ञातृशक्ती', 'ज्ञप्ती' किंवा 'संवित्ती' सर्व पदार्थांना भासमान

करते. ती सूर्याप्रमाणे स्वयंप्रकाशित आहे. बाह्य वस्तूंचा बोध करवून देणे आणि हा बोध जेव्हा नसतो, तेव्हा आत्मस्वरूपात प्रतिष्ठित असणे हा संवित्तीचा स्व-भाव आहे.

'शिवौनि पृथ्वीवरी' या ओवीचे अतिशय मार्मिक उद्‌बोधन विनोबांनी त्यांच्या 'ज्ञानदेवांची भजने व त्यावरील चिंतनिका' मध्ये मोजक्या शब्दात केले आहे.

विनोबा लिहितात-

संवित्ति - सकल संवेदनाधार, वेद्य-वेदकत्वातीत व केवळ वेदनस्वरुप मूल स्रोत.

शिव - परम जीव (चेतन), दृष्टयाचे उदाहरण ।

पृथ्वी - अधम भूत (जड), दृश्याचे उदाहरण ।

शिवौनि पृथ्वी वरी - उच्चावचः द्रष्टु-दृश्यरूप, जड-चेतन; निखिल पदार्थ ।

पदार्थांचि या 'परि' - पदार्थांचे अनेक प्रकार आणि वर्ग, जाति-व्यक्तींनी बनलेले, विविध व्यष्टिरूप किरणवत् ।

एकसरी - पृथक् भावांचे एकीकरण करणारी, एकजिनसी एकमेव (अद्वितीय) । सूर्यवत् ।

प्रकाशे - प्रकाशित होते, झाकली जात नाही, उलट अधिक शोभते, फाकते।

भासती - अवभासित होतात (करता - परी) । हयात मिथ्यात्वहि सूचित आहे.''

विनोबांचे या ओवीवरील भाष्य सूत्ररूप असले तरी त्यात गहन अर्थ भरला आहे.

'शिवौनि पृथ्वीवरी' म्हणजे समस्त जडचेतन पदार्थ। या सर्व पदार्थात दर्शन-शक्तीच 'संवित्ती' च्या रूपाने विराजमान आहे. द्रष्टा म्हणजे पाहणारा आणि पाहिले जाणारे सर्व दृश्य पदार्थ यांच्यात एक विलक्षण संबंध आहे. द्रष्ट्याशिवाय दृश्याला अर्थ नाही आणि दृश्य नसेल तर द्रष्टा केवल एक-मात्र असतो ती त्याची प्रतिष्ठा आहे. परंतु तो स्वयंप्रकाशी असल्यामुळे त्याच्या अंगभूत दर्शनशक्तीत तो त्यावेळी अवस्थित असतो. द्रष्टा आणि दृश्य यांच्या संयोगातूनच वस्तूचा बोध होत असतो. ही बोधप्रक्रिया ज्ञान शक्तीची किंवा संवित्तीची क्रीडा आहे. दर्शनक्रियेमधून किंवा ज्ञान -प्रक्रियेतून ही 'एकसरी' म्हणजे एकजिनसी 'संविति' वस्तूंचे पृथक्करण analysis व संश्लेषण synthesis या माध्यमातून ज्ञानार्जन घडवून आणते.

विनोबांनी ज्ञानदेवांच्या 'शिवौनि पृथ्वीवरी' या ओवीचे जे समालोचन केले आहे ते सूत्ररूपात ज्ञानदेवांचा 'चिद् -विलास' प्रगट करते.

'शिव -शक्ति किंवा पुरुष प्रकृति', हे ज्ञान घडवून आणणारे मिथुन आहे. आधारभूत शिव-तत्व किंवा 'पुरुष' आणि त्यावर स्फुरण पावणारे शक्ति-तत्व किंवा प्रकृती यांचे वेगळेपण किंवा द्वैत नाही. एकाच तत्वाचे निरंतर होणारे हे स्फुरण आहे. या विचाराला स्पष्ट करण्याकरिता ज्ञानदेवांनी 'भिंत-चित्र' हा दृष्टांत दिला आहे. 'जे नाही ते' म्हणजे जे पूर्वी प्रगट झाले नव्हते अशा चित्राला प्रकाशित करणारी म्हणजे आधार देणारी केवळ भिंतच असते. चित्राला भिंतीशिवाय अस्तित्व नाही शिवाय चित्राच्या दृष्टांताने संवित्तीचा कल्पनारम्य विलासही सूचित होतो. जे उत्पन्न होते त्याला आधार असतो. त्या आधारावरच त्या वस्तूचे प्रगटन होते आणि उत्पन्न झालेल्या वस्तूचा नाश म्हणजे विसर्जन त्याच आधारावर होत असते. चित्रे बदलतात पण भिंत मात्र कायम असते.



⌘❖⌘

# ५. गुळाची ढेप आणि कापडाचे ठाण

बांधेयाचिया मोडी । बांधा न हौनि गुळाची गोडी ।
तिया परी जग-परवडी । संवित्ति जाण ॥ १० (१४)

घडियेचेनि आकारें । प्रकाशिजे जेवि अंबरे ।
तेंवि विश्वस्फूर्ती स्फुरे । स्फूर्ति चि हे ॥ ११ (१५)

(गुळाची ढेप मोडल्यानंतर ढेपेचा आकार राहत नाही परंतु तिच्या प्रत्येक तुकड्यातून गुळाची गोडी कायम राहते. त्याप्रमाणे समग्र जगाच्या वस्तुमात्रात संवित्तीच अंगभूत असते. कापडाची घडी केली तरी त्याचे कापडपण जात नाही त्याचप्रमाणे विश्वस्फूर्तीच्या परिणामाने वस्तुमात्र वेगवेगळे भासतात पण स्फूर्तीचा एक जिनसीपणा तसाच राहतो.)

गुळाची ढेप आणि घडी केलेले कापड या दृष्टांतांनी ज्ञानदेवांनी द्रष्ट्याच्या नजरेने जग कसे दिसते आणि त्यातून प्रतीत होणारा विविध वस्तूचा वेगळेपणा हा कसा आभासिक किंवा विवर्तरूप आहे याचे मार्मिक विवेचन केले आहे. पाहणाऱ्याच्या दृष्टीला जगात अनंत आकार-प्रकार आढळून येतात. वस्तुपरत्वे त्यांची घडण वेगवेगळी असते. एकाच मूळ तत्त्वावर भासमान होणारी ही विविध नामरूपे आहेत. नामरूपांना जे अस्तित्व आहे ते त्यावेळेपुरते असते. गुळाची ढेप केली तर तिला एक स्वतंत्र आकार व नाव येते. तीच मोडली तर तो आकार व ते नाव राहत नाही. कापडाची घडी केल्याने लांब

कापडाचा आकार जाऊन त्याला घडीचा आकार येतो व घडी हे नाव मिळते. घडी मोडली तर कापडाचा वेगळा आकार दिसून येतो व त्याला नावही वेगळे असते. परंतु गुळाची ढेप मोडल्याने त्याची गोडी कमी होत नाही; ती त्याच्या प्रत्येक कणात ओतप्रोत असते. तसेच वस्त्राची घडण किंवा त्याचा ताणाबाणा, त्याची घडी केल्याने किंवा घडी उकलल्याने नाहीसा होत नाही. गुळाच्या प्रत्येक कणात जशी गोडी असते तसेच वस्त्राच्या प्रत्येक भागात सुताचीच वीण असते.

ज्ञानदेवांनी हे दोन दृष्टांत, द्रष्टा व दृश्य यांच्यातील द्वैत आभासिक किंवा कल्पित आहे, या दोघांनाही व्यापून असणारी संवित्ती 'एकसरी' म्हणजे एकजिनसी स्फूर्ती आहे, असे सूचित करण्यासाठी दिले आहेत.

द्रष्ट्याची दृष्टी ही शक्ती आहे आणि दृश्याला दृश्यत्व म्हणजे प्रकट होण्याची शक्ती आहे. द्रष्टुत्व आणि दृश्यत्व यांचा परस्पर आश्रय असल्यामुळे दर्शन शक्य होते. या दोन्ही वस्तूंना म्हणजे द्रष्ट्याला आणि दृश्याला आधारभूत असणारी शक्ती 'संवित्ति' या नावाने ओळखली जाते. ज्ञानदेवांनी विश्लेषण आणि संश्लेषण (analysis and synthesis) या दोन्ही पद्धतीचा अवलंब करून हा सिद्धांत मांडला आहे. सर्व वस्तूंचे अस्तित्व सापेक्ष (relation) आहे. त्यांचे परस्परावलंबन (reciprocity) आहे. सर्व वस्तूंचा समग्र विचार केला तर हे 'एकसरी' वैशिष्ट्य (Homogenity or Holistic Nature) लक्षात येते. हे ध्यानात येण्यासाठी जशी विश्लेषणाची पद्धती उपयोगी आहेत, तशीच किंबहुना त्याहून अधिक उपयोगी संश्लेषणाची पद्धती आहे. वस्तुमात्रात दिसून येणारा वेगळेपणा हा स्थल-काल-सापेक्ष-व्यूह (space-time-continuum) आहे हेच आधुनिक विज्ञान मान्य करते. तेव्हा हा वेगळेपणा सापेक्ष किंवा आभासिक (relatively illusory) आहे. त्यात नित्य परिवर्तन होत असते. एके काळी दिसणारे

जग दुसऱ्या वेळी तसेच दिसत नाही. हा जो परिणाम (effect) होतो त्याचे आकलन करणारी व त्याला आश्रय देणारी शक्ती एकच असून तीच 'संवित्ति' आहे.

व्यष्टी आणि समष्टी ही एकाच शक्तीची द्विविध रूपे असून ती रूपे क्षणोक्षणी बदलत आहेत. संवित्तीची धारणा गृहीत धरल्यास त्या परिवर्तनाची तर्कशुद्ध संगती लागू शकते.

चांगदेव स्वतः योगी असल्याने विचार-शून्य अवस्थेत काही काळ राहणे त्यांना साध्य होते. परंतु समाधीतून उत्थान झाल्यानंतर जग दिसते व समाधीत त्याचा निरास घडून येतो या दोन गोष्टींची बैठक त्यांना कदाचित आकळली नसावी हे जाणून ज्ञानदेवाने हा उपदेश दिला असावा.

⌘❖⌘

# ६. आपणया संमुख आपणचि जो

न लिंपता सुख दुःख । येणे आकारे क्षौभौनि नावेक ।
होये आपणेया संमुख आपण चि जो ॥१२(१६)

वाद्यजाते विण ध्वनि । काष्ठजाते विण वह्नि ।
तैसे विशेष ग्रासौनि । स्वये चि असे ॥१३(२१)

(सुखदुःखाचा स्पर्श न होता तो (परमात्मा) अनेक आकारांनी स्फुरतो (क्षोभौनि) आणि जेव्हा तो आपल्यालाच पाहतो (संमुख) तेव्हा तो आपणच असतो.)

(वाद्यांच्या वाचून जसा ध्वनि (किंवा) लाकडावाचून जसा अग्नि (आपल्याच) स्वरूपात असतो तसा हा (परमात्मा) सर्व विशेष नाहीसे करून स्वयं म्हणजे स्वतःच्या स्वरूपात विराजमान असतो.)

परमात्मा आणि त्याच्या सृजन शक्तीने निर्माण होणारी सृष्टी यांचे निरूपण इथे केले आहे. परमात्मा स्वतंत्र आहे. याचाच अर्थ तो कोणत्याही साधनांवर अवलंबून नाही. तो स्वेच्छेने जगत् निर्माण करतो व त्याचा विलय करतो. उत्पत्ति-स्थिति-लय या सर्व अवस्थांना तोच उपादानकारण (Material cause) आणि निमित्त कारण (Efficient cause) आहे. उत्पत्ति-स्थिति-लय या विश्वाच्या आवर्तनाचा तो साक्षिचैतन्याने आनंद घेतो. त्यात तो गुंतून पडत नाही त्यामुळे तो

स्वतंत्र आहे, दुसऱ्या शब्दात सांगावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की, तो सुखीही होत नाही आणि दुःखाचाही त्याला स्पर्श होत नाही.

समष्टिस्वरूपाचे आणि त्याला अधिष्ठानभूत असणाऱ्या परतत्त्वाचे हे निरूपण असले तरी त्यातून व्यष्टीला बोध होतो. वस्तुमात्रात जे चैतन्य आहे ती परमात्म्याची ऊर्जा असून किरण रूपाने-प्रकाश रूपाने ती त्यात अवस्थित असते. मनुष्यात ती चेतनेचे रूप धारण करते. ती स्वतंत्र व स्वयंप्रकाश असून मनुष्याच्या सर्व व्यापारांना तीच आधारभूत आहे. या चेतनेमुळे मनुष्याला सृजनशक्ती प्राप्त होते. तो आपल्या व्यवहाराचे व अनुभवांचे स्वतंत्र विश्व निर्माण करू शकतो.

परंतु हे अनुभवविश्व निर्माण करतांना तो त्यात गुंतून पडतो. प्रत्येक अनुभवाला तो चांगला किंवा वाईट असे नाव देतो. हे करतांना मनासह सर्व इंद्रियांना जे अनुकूल वाटते ते तो निवडतो. ही निवड त्याच्यावर स्मृतिरूपाने उमटलेल्या संस्कारातून घडून येते. जो अनुकूल अनुभव येतो त्याच्या प्राप्तीचा तो प्रयत्न करतो. प्रतिकूल अनूभवाला टाळण्याचा त्याचा प्रयास असतो. अनुकूल अनुभव सुखकारक वाटतात व प्रतिकूल अनुभव दुःखकारक भासतात. सर्व अनुभव परिस्थितिसापेक्ष असतात आणि परिस्थिती सतत बदलत असते. निवड करण्याच्या (choice) भूमिकेतून सुख-दुःख निर्मिती होत असते. सुखदुःखाच्या या चक्रातून त्याचे संपूर्ण जीवन वर्तत असते.

सुखदुःख या भावना बहुतांशी मनोव्यापारातून उत्पन्न होतात. हा मनोव्यापार अतिशय गुंतागुंतीचा असतो, त्यामुळे सुखदुःखाच्या आवर्तनातून त्याची सुटका होत नाही. सर्व व्यवहार हा एका महापूर आलेल्या नदीसारखा सतत वाहत असतो. त्यात गुंतून पडणारा त्या प्रवाहाबरोबर ओढला जातो त्याला ओघ-विवशता म्हणता येईल. परंतु किनाऱ्यावर उभे राहून महापुराचे हे दृश्य तटस्थपणे पाहणाऱ्याला

अलिप्त राहता येते. अशा वृत्तीला ओघ-बाह्यता म्हणता येते. तटस्थ वृत्तीत सुखदु:खाचा प्रत्यय येत नाही. उलट चित्रविचित्र आकाराने व विविध गुणांनी नटलेले हे विश्व पाहून त्याला निरपेक्ष आनंदाची अनुभूती येते. ''तैसे विशेष ग्रासौनि । स्वये-चि असे''. अशी ही प्रतिष्ठा आहे.

जीवनाची ही यथार्थता दाखविण्यासाठी ज्ञानदेवांनी दोन दृष्टांत दिले आहेत. वाद्याशिवाय ध्वनीला स्वतंत्र अस्तित्व आहे. तसेच लाकडावाचून अग्नी प्रगट होऊ शकतो. वाद्य हे ध्वनीच्या अभिव्यक्तीचे आणि लाकूड हे अग्नीच्या प्रगट होण्याचे केवळ साधन आहे. कोणतेही साधन स्वयंप्रेरित नसते. ध्वनिशिवाय वाद्य वाजू शकत नाही आणि अग्निशिवाय लाकूड जळत नाही. आत्मा स्वयंभू आणि स्वतंत्र आहे. तो आपल्या शक्तीने अनुभवविश्वाची निर्मिती करतो. परंतु अनुभवविश्व हाच आत्मा आहे. असा आरोप केल्यामुळे सुखदु:खनिर्मिती होते हे तत्त्व विशद करून सांगण्यासाठी ज्ञानदेवांनी ध्वनी आणि अग्नी यांचे दृष्टांत दिले आहेत. आत्म्याच्या स्वतंत्रतेचा बोध त्यातून अपेक्षित आहे.

सभोवतालचे विश्व व त्याचे व्यवहार परिवर्तनशील आहेत. मनुष्यरूपाने जे चेतन तत्त्व प्रतीत होते ते स्वरूपत: स्वतंत्र आहे. साक्षिचैतन्याचे निरंतर भान ठेवल्यास सुखदु:खाची जी शृंखला निर्माण होते त्यापासून मुक्तता मिळू शकते.

⌘❖⌘

# ७. डोळयाचे बुबुळ आणि दृष्टी

जें म्हणता नये कांही । जाणों न ये कैसे हि ।
असत चि असे पाही । असणे जेया ॥ १४(३०)

आपुलेया बुबुळा । दृष्टी असौनि अखम डोळा ।
तैसा आत्मज्ञानी दुबळा । ज्ञान-रूप जो ॥ १५(३१)

(कोणत्याही शब्दांनी किंवा संकेतांनी जे निर्देशित होत नाही, ते भावरूप असणारे केवळ अस्तित्व आहे.)

(बाहेर पाहणारी दृष्टी आपलेच बुबुळ पाहण्यास अक्षम असते त्याप्रमाणे (जो बाहेर पाहतो) तो जाणकार असूनही, आत्माज्ञानात दुबळा असतो.)

आत्मतत्त्व आणि तद्‌विषयक ज्ञान याचे वरील ओव्यातुन विवरण करण्यात आहे आहे. आत्मतत्त्वाचे ज्ञान सामान्य ज्ञानक्रियेतून होऊ शकत नाही. कारण ते तत्त्व अतिशय सूक्ष्म आहे. वस्तूचे यथार्थ ज्ञान प्रत्यक्ष प्रमाणाने होत नाही. प्रत्यक्ष प्रमाणाने उत्पन्न होणारे ज्ञान, इंद्रिये व त्यांच्या क्षमतेवर अवलंबून असते. डोळयांनी पाहता येते, कानांनी ऐकता येते, नाकाने वास कळतो. त्वचेने स्पर्श जाणवतो, जिभेने चव कळते पण ज्या वस्तूला दृश्यत्व, इत्यादि गुण नाहीत त्या वस्तूचे ज्ञान या स्थूल इंद्रियांच्या माध्यमातून कसे होणार ?

सूक्ष्म वस्तूंच्या स्थितीचा किंवा गतीचा बोध घेण्याच्या प्रक्रियेत त्या वस्तूच्या स्थितीत किंवा गतीत फरक पडतो. इलेक्ट्रॉन या सूक्ष्म कणाची, विशिष्ट क्षणी निश्चित स्थिती व गती यांचे ज्ञान इलेक्ट्रॉन-सूक्ष्मदर्शक यंत्रातून मिळू शकत नाही. कारण, पाहण्याच्या क्रियेमधून त्या सूक्ष्मकणाची स्थिती व गती याच्यात फरक घडून येतो.

तीच स्थिती अंत:करणाची आहे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार यांनी अंत:करण बनले आहे. परंतु इंद्रियामार्फत ग्रहण करण्यात आलेल्या संवेदनांचे विश्लेषण-संश्लेषण मेंदूच्या नेमक्या कोणत्या पेशीमध्ये होते अशी एक पेशी आहे की, अनेक एक असेल तर तिचे नेमके स्थान कोणते आणि अनेक असतील तर त्यांची संगती कोण घडवून आणतो. हे सर्व प्रश्न अनुत्तरित आहेत. अतिसूक्ष्म कणांचे किंवा सूक्ष्म पेंशींच्या कार्यपद्धतीचे जे ज्ञान असते ते ढोबळ मानाने म्हणजे संभाव्यतेच्या सिद्धांतावर (Law of Probabilities) किंवा सांख्यिकीय अनुमान (Statistical inference) यावर आधारित असते. सूक्ष्म कणांच्या किंवा पेशींच्या वर्तनाचे केवळ ढोबळमानाने ज्ञान प्राप्त होत असते. जे आत्मतत्त्व, सूक्ष्मातिसूक्ष्म आहे, सर्व व्यापक आहे आणि प्रपंचाचे एकमेव कारण आहे त्याचा बोध सामान्य ज्ञान प्रक्रियेतून होत नाही.

''जे म्हणता नये कांही । जाणो न ये कैसे हि'' ।

हा त्या आत्मतत्त्वाचा महिमा ज्ञानदेवांनी गाइला आहे. तो यथार्थ आहे.

आत्म्याचे वर्णन करतांना श्रुती देखील मुकी होते. प्रतिषेधात्मक वचनांनी श्रुती तिचा निर्देश करते. ''नति नेति'', ''अदृष्टं, अव्यवहार्यं, अग्राह्यं, अलक्षणं, अचिन्त्यं, अव्यपदेश्यम्'' असा उल्लेख करून शेवटी ''शांन्तं, शिवं, अद्वैतम्'' असे म्हणून स्तब्ध बसते. ज्ञानदेव म्हणतात,

"असत चि असे पाही । असणे जेया ।।"

आत्मतत्त्व हे केवळ एकमात्र अस्तित्त्व आहे.

कोणत्याही ज्ञान प्रक्रियेत ज्ञाता, ज्ञेय व त्यांच्या संबंधातून उत्पन्न होणारे ज्ञान, ही त्रिपुटी असते. या तीन घटकांची परस्पर-आश्रयता आहे. पण निराश्रय असणारे आत्मतत्त्व किंवा संवित्ती कसे जाणणार ? जाणणेच स्वत:ला विषय कसा करणार ?

ज्ञानदेवांनी हा प्रश्न मार्मिक दृष्टांत देऊन हाताळला आहे.

"आपुलेया बुबुळा । दृष्टि असौनि अखम डोळा ।"

तैसा आत्मज्ञानी दुबळा । ज्ञानरूप जो ।।

पाहण्याची शक्ती डोळयात आहे परंतु डोळा त्या शक्तीने आपले बुबूळ पाहण्यास अक्षम (अखम) आहे. तद्वत् जे केवळ ज्ञानस्वरूप असे आत्मतत्त्व किंवा संवित्ती आहे ते सामान्य ज्ञान प्रक्रियेतून ज्ञात होऊ शकत नाही. या ज्ञान-सागरावर अनेक वृत्तिरूप तरंग उठत असले तरी त्यातून त्याची खोली कशी कळणार ? तरंगांनी समुद्रात कितीही क्रीडा केली तरी त्यांनी समुद्राची व्याप्ती कशी मापणार ? या ओवीतून ज्ञान प्राप्त करण्यासाठी धडपडणारा क्रियाशील जिज्ञासू आणि निखळ ज्ञानमात्रता याचा (ज्ञानदेवांना अभिप्रेत असणारा) संबंध "स्वात्मनि क्रियाविरोध:" या शब्दात विनोबांनी सांगितला आहे. आत्मसाक्षात्कारात कोणतीही क्रिया असत नाही. असते ते केवळ स्वरूप! ते अद्वैत आहे.

⌘❖⌘

# ८. आत्म्याची स्वरूपात प्रतिष्ठा

नाना बोधांचिये सोयरिके । साचपण जेणे एके ।
नाना कल्लोळ मालिके । पाणियें जेंवि ।। १६(३४)

जें देखिजते विण । एकले देखतेपण ।
हे असो, आपणेंया आपण । आपण चि जें ।। १७ (३५)

(जगातील नाना बोध आणि त्यांच्यातील परस्पर-संबंध (सोयरीक) - दोघांनाही आधार आत्म-तत्त्व आहे. जसा तरंगाच्या मालिकांना पाणी हाच आधार आहे.)

(जे स्वत:दृश्य न होताच निरपेक्ष द्रष्ट्टत्त्व किंवा पाहणे असते ते आपणच आपल्यामध्ये प्रतिष्ठित होणे असते.)

''विश्वरूप हे असंख्य रूपांचे बनलेले असून एकेका-रूपात असंख्य प्रकार दडलेले आहेत. एकेका प्रकाराचे असंख्य आकार असून, एकेका आकारात असंख्य वर्ण भरलेले आहेत.''-विनोबा

सर्व वस्तूंचा बोध होण्याची दुहेरी प्रक्रिया आहे. चक्षु, श्रोत्र, नासिका, जिव्हा व त्वचा यांच्या माध्यमातून वस्तूचे रूप, शब्द, घ्राण, रस आणि स्पर्श यांच्या संवेदनांचा प्राथमिक बोध (Primary congnition) होतो.परंतु त्या त्या इंद्रियांनी ग्रहण केलेल्या त्या विशेष सेवदेनांचे पृथक्करण व संश्लेषण अंत:करणात घडून येते. तिथेच

त्यांचा पूर्वानुभावाशी किंवा स्मृतीशी संयोग होतो आणि प्रतीत होणाऱ्या वस्तूचे धर्म, गुण, क्रिया व संबंध यांचा निश्चय होत असतो. हा त्या वस्तूचा दुय्यम बोध (Secondary cognition) होय. दुय्यम बोधातूनच त्या वस्तूचे विशेष लिंग किंवा प्रतीक (Differential mark) नामाच्या रूपाने प्रगट होते.

नानाविध वस्तूंची नानाविध नामरूपे असली तरी त्यांचा बोध ज्या एका चैतन्यमय तत्वावर घडून येतो ती जाणीव (Consciousness) किंवा संवित्ती आहे. हीच संचित्ती पूर्वानुभवाशी त्या वस्तूंचे नाते किंवा सोयरीक घडविते. ज्ञानेंद्रिये व अंत:करण यांना चालना देणारे संवित्ती हेच तत्त्व आहे. ज्ञानेद्रिये आणि अंत:करण वस्तु-तंत्र असतात म्हणजे त्यांचा व्यापार संवित्तीच्या योगाने घडतो. ज्ञातृत्व किंवा संवित्ती स्वतंत्र आहे. सर्व व्यवहाराला आधार किंवा आश्रय आहे. ज्याप्रमाणे लहान मोठ्या सर्व तरंगांना पाणी हाच आधार असतो तसा बोध निर्माण करणाऱ्या सर्व वृत्तींना संवित्ती आधार आहे.

ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय म्हणजे जाणणारा, जाणण्याची क्रिया आणि जाणला जाणारा विषय, हे संवित्तीचे परिणाम आहेत, पण संवित्तीच्या मुळ स्वरूपात त्यामुळे कोणताही बदल घडून येत नाही. संवित्तीवर जेव्हा वृत्तिरूप तरंगांची हालचाल नसते तेव्हाही ती आपल्याच स्वरूपात अवस्थित असते. इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती आणि क्रियाशक्ती या सर्व संवित्तीच्या वृत्ती आहेत. जेव्हा संवित्ती वृत्ति-शून्य असते तेव्हा ती केवळ 'असते'. त्या अवस्थेचे शब्दात वर्णन करणे शक्य आही; कारण, सर्व शब्द संकेतरूप असतात. ज्ञानदेव म्हणतात " हे दृष्टिविना पाहणे आहे; कारण, ते आपणच आपल्याला पाहत असते." सर्व शब्द, सर्व संकेत, सर्व अर्थ तिथे मुके होतात.

ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय ही त्रिपुटी आभास आहे. वस्तुत: जाणणारा आणि जाणले जाणारे यात अभेदच आहे. वृत्तिविशेषामुळे हे भेद

प्रतीत होतात. क्रियाशून्य किंवा वृत्तिशून्य अवस्थेत आत्मा स्वरूपात प्रतिष्ठित असतो.

''तथा द्रष्टुः स्वरूपे अवस्थानम्''

⌘❖⌘

# ९. क्रिया-शून्य दर्शन

जे देखिजते विण । एकले देखतेपण ।
हे असो आपणेया आपण । आपण चि जे ।। १७(३५)

(पाहण्यावाचून जे निव्वळ 'देखते' पण (द्रष्टुत्व) आहे ते आपणच आपल्यामध्ये अवस्थित असणे आहे.)

आपण जे दृश्य पाहतो, जो शब्द ऐकतो, तो स्पर्श आपल्याला जाणवतो, जो रस आपण चाखतो, जो वास आपण घेतो त्या सर्वांची नोंद अंत:करणात होते. दृश्य, शब्द, स्पर्श, रस, वास हा सर्व अनुभव आपला स्वत:चा म्हणजे खाजगी असतो. या सर्व अनुभवातून आपले व्यक्तिगत विश्व साकारत असते. तेच दृश्य पुन्हा पाहण्यात आले तर पूर्वी पाहिलेल्या दृश्याची आठवण होते परंतु एवढ्यावरच ही क्रिया थांबती तर केवळ अनुभवांचा व आठवणींचा संग्रह झाला असता. तसे होत नाही. इंद्रियांची व अंत:करणाची अनुभवातून निवड करण्याची वृत्ती असते. प्रिय-अप्रिय असे अनुभवांचे आपण विभाग करतो. प्रिय अनुभवांची पुनरावृत्ती व्हावी आणि अप्रिय अनुभव टाळता यावे असा आपण प्रयास करतो. सुखदु:खाची निर्मिती  या प्रयासातून होत असते. इंर्दियांची व अंत:करणाची ही स्वाभाविक प्रवृत्ती आहे. परंतु पाहिलेले दृश्य, ऐकलेला आवाज, जाणवलेला स्पर्श, मिळालेला स्वाद हे सर्व जाणणारा, तसेच अंत:करणात पूर्वानुभवातून उठलेल्या

सुखदु:खादि भावांना आकळणारा, हा ह्या सर्व व्यापाराहून अलिप्त आहे, निर्विकार व अ-संग आहे ही जाण असली तर त्या सर्व व्यापाराला तटस्थतेने पाहता येते. एक विशिष्ट प्रकारचा अनुभव एकदा सुखद वाटला तर त्याच प्रकारचा अनुभव दुसऱ्या वेळेस सुखद वाटेलच असे नाही. तेच अप्रिय अनुभवाचे आहे. सर्व अनुभव परिस्थिती-प्रमाणे बदलत असतात. सुख-दु:ख हे द्वंद्व देखील सातत्याने बदलत असते.

परंतु या सर्व अनुभवांचा आधार असणारे, त्यांच्या निर्मितीला कारण असणारे तत्त्व, संवित्ती आहे. ही संवित्ती एकरस आहे. तिच्या पृष्ठभागावर सुखदु:खाचे तरंग उठत असतात परंतु ते तरंग म्हणजे संवित्ती नव्हे. ज्या संवित्तीवर हे तरंग उठतात. ती त्या तरंगांना निमित्त आणि आश्रय असते. संवित्तिशिवाय त्यांना वेगळे अस्तित्व नाही. या संवित्तीच प्रतिष्ठित होणे म्हणजेच तिच्या साक्षित्वाचे, अलिप्ततेचे, तटस्थतेचे निरंतर भान असणे होय.

ज्ञानदेव म्हणतात ही अवस्था म्हणजे 'देखिजते विण एकले देखतेपण' होय. त्या अवस्थेत द्रष्टा आपल्याच दर्शनशक्तीचा निरालंब आनंद घेतो. विनोबा याला 'क्रिया-शून्य दर्शन' म्हणतात.

पातंजलींनी ''योग: चित्तवृत्ति निरोध:'' (चित्तवृत्तींचा निरोध म्हणजे योग होय.) अशी योगाची व्याख्या केली आहे; चित्तवृत्ती म्हणजे संवित्तीवर उठणारे तरंग होत. त्या तरंगांचा निरोध म्हणजे त्यांना दाबून टाकणे नव्हे. चित्त-वृत्तीचा स्फुरण पावणे हा धर्म असल्यामुळे त्यांना दाबण्याचा प्रयत्न करणे म्हणजे ते तरंग सतत उत्पन्न करणे होय. त्या उलट त्या तरंगाकडे क्रिया-शून्य वृत्तीने पाहणे म्हणजे तटस्थ होणे होय. या साक्षित्वाचा सतत अभ्यास हाच चित्तवृत्ती निरोधरूपी योग होय असे 'क्रिया-शून्य दर्शन' या पदातून विनोबांना अभिप्रेत असावे.

या ‘क्रियाशून्यदर्शनाची’ अभिव्यक्ती करताना ज्ञानदेव म्हणतात, ‘‘आपणेया आपण । आपणचि जे ।’’

या ओवीचे रसग्रहण करताना विनोबा योगसूत्राचा दाखला देतात. ‘‘द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्’(त्यावेळी द्रष्टा त्याच्या स्वरूपात अवस्थित असतो) ही जी क्रिया-शून्य दृष्टी आहे, तिच्या अभावी ‘‘वृत्तिसारूप्यमितरत्र’’ (द्रष्टा चित्तवृत्तीशी तादात्म्य पावतो.) असे योगसूत्र म्हणते. द्रष्ट्याचे चित्तवृत्तीशी जे ऐक्य निर्माण होते त्यातून सुखदु:खाची मालिका तयार होते परंतु जेव्हा द्रष्टा स्वरुपात स्थित होतो तेव्हा तो सत्-चित्-आनंदमयी असतो. त्याच्या सर्व वृत्ती शांत झाल्या असतात.

शुभ्र स्फटिकाच्या जवळ लाल जास्वंदीचे फूल ठेवले तर स्फटिकाला. लालिमा आल्याचा भास होतो. ते फूल दूर नेले हतर स्फटिक पूर्ववत् शुभ्र दिसतो. चित्तवृत्तींशी तादात्म्य पावल्यामुळे संवित्ती तद्रूप झाल्यासारखी भासते पण हा आभास त्यावेळेपुरता असतो. संवित्तीत स्वरूपत: कोणताही विकार घडून येत नाही, याची सतत जाण असणे हेच ‘देखिजते विण एकले देखतेपण’ आहे.

⌘❖⌘

# १०. आनंद-विस्ताराची प्रक्रिया

जें कोणाचें नव्हतेनि असणें । जें कोणाचें नव्हतां दिसणे ।
कोणाचे नव्हता भोगणे । केवळ जो ।। १८(३६)

(जे निरामय अस्तित्व आहे, जी निरालंब दृष्टी आहे, जे निखळ भोगणे आहे, असे ज्याचे स्वरूप आहे. तो केवळ एकमात्र आहे.)

शिवापासून पृथ्वीपर्यंत सर्व पदार्थांना आधारभूत होणारे जे एकमात्र तत्त्व आहे, ज्याच्या 'एकसरी' प्रकाशाने ते सर्व पदार्थ भासमान होतात, ते तत्त्व सत्-चित्-आनंद स्वरूप आहे.'सत्' म्हणजे ते नित्य शाश्वत आहे, 'चित्' म्हणजे ते स्फुरण पावणारे आहे. 'आनंद' म्हणजे ते सत् आणि चित् यांच्या 'असणे' पणाला व 'प्रकाशाला' हेतु किंवा प्रयोजन आहे.

ज्ञानदेवांनी चांगदेवाला जो बोध पासष्ट ओव्यातून दिला त्यातून त्या परमतत्त्वाचेच निरूपण केले आहे. इच्छा, ज्ञान आणि क्रिया या त्रिविध शक्तींचा उत्कर्ष म्हणजे, चिद्‌विलास असून त्याला आनंद हाच आधार आहे.

सर्व विश्व अनंतविध पदार्थांचे बनले आहे. त्या पदार्थांना आभास म्हणजे दृश्यत्व आहे. द्रष्ट्याला म्हणजे पाहणाऱ्याला दृष्टी

आहे म्हणजे पाहण्याची क्षमता आहे. दृश्य पदार्थ जेव्हा जाणला जातो तेव्हा दृष्टव्य आणि द्रष्टा यांच्यात एक अनुबंध किंवा संबंध निर्माण होतो; हेच दर्शन होय. यालाच प्रमातृचैतन्य, विषय-चैतन्य आणि त्यांच्या संयोगातून उत्पन्न होणारी प्रमा किंवा ज्ञान, असे म्हणतात. ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान यांचा अतूट संबंध आहे. जगदाभास म्हणजे ज्ञानविस्तार असून ही निरंतर सुरू असणारी प्रक्रिया आहे. जग परिवर्तनशील असल्यामुळे त्या परिवर्तनाचा बोध होणारी क्रिया सतत सुरू असते. व्यक्तीला येणारे सर्व अनुभव हे ज्ञानरूपच असतात. हे अनुभव येण्यासाठी ज्ञानेंद्रिये तसेच अंत:करणाचे 'असणे' हे आवश्यक आहे. हे 'अस्तित्व' असून त्यावर ज्ञाननिधीचे स्फुरण होते. हेच 'चित्' आहे. परंतु अनुभव घेण्याची प्रेरणा असावी लागते कारण प्रेरणा नसेल तर हा सर्व प्रपंच यंत्रवत् - जड होईल व त्यातून होणारी बोधोत्पत्ती निरर्थक होईल. म्हणून सत् व चित् या दोन तत्वांना आनंद हा प्रेरणा स्त्रोत आहे.

जगतातील प्रत्येक वस्तूमध्ये सत् - चित् - आनंदांश आहे. वस्तुपरत्वे जी विविधता दिसते, जो पृथक्‌भावाचा आभास होतो तो केवळ नामरूपात्मक भेदामुळे गोचर होतो. मातीपासून बनविलेल्या सर्व वस्तूंना वेगवेगळा आकार असतो व त्यांना अनुरूप नावे असतात. त्याचप्रमाणे सत् - चित् - आनंदाच्या मुळ आधारावर सगळी नामरूपे प्रगट होतात. जगदाभासामुळे वैविध्य व वैचित्र्य प्रतीत होत असले तरी हे भाव शाश्वत नसून परिवर्तनशील आहेत आणि त्यांच्या नित्य परिणामतेचे भान ठेवल्यास या सर्व प्रक्रियेतून निखळ, निरपेक्ष आनंद प्रत्ययास येतो हा आनंद ज्याला प्रतीत होतो त्याचेही तेच स्वरूप आहे.

परंतु जगदाभास तुच्छ आहे कारण तो सतत बदलत असतो. म्हणून त्याचा सर्वस्वी त्याग करून केवळ आपल्या स्वरूपात मग्न

राहणारे लोक विविधतेच्या आनंदापासून वंचित होतात. त्यांची प्रवृत्ती कुंठित व संकोचित होते. त्यातून एककल्लीपणा किंवा वेडाचार निर्माण होऊ शकतो. प्रत्येक व्यक्ती ही समष्टीचेच प्रतीक आहे. त्याच्यात जे सत् - चित् - आनंद स्वरूप आहे तेच विश्वातील प्रत्येक वस्तूत आहे. हा साक्षात्कार झाल्यास आत्मगुंठनाच्या अतिरेकी प्रवृत्तीला आळा घालता येतो, किंबहुना त्यातून सृजनाचा निरपेक्ष आनंद मिळविता येतो.

जो 'केवळ' आहे तोच 'समस्त' आहे, किंबहुना 'समष्टीचा' 'केवळ' हा आविर्भाव आहे. ही दृष्टी म्हणजे 'चिद्‌विलास' होय. जे 'सत्' आणि 'चित् ' आहे त्याचे प्रयोजन आनंद आहे. वस्तू आणि तिचा 'गुण' वस्तुहून वेगळा नाही. गूळ आणि त्याची गोडी वेगळी करता येत नाही. पाणी आणि तरंग एकमेकापासून भिन्न नाहीत. हा एकात्मतेचा भाव म्हणजे आनंदाचा विस्तार होय. 'कोणाचे नव्हता भोगणे । केवळ जो या ओवीतून उन्मेष निघतो.

⌘❖⌘

# ११. पुत्र तू वटेश्वराचा

तेया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा ।
चांगया ! तुज मजआपणे याचा । बोल आइकें ॥ १९(३७)

ज्ञानदेवो म्हणे । तुज माझा बोल आइकणें ।
तें तळहाता तळी मिठी देणें । जिया परी ॥ २०(३८)

(चांगदेवा, तू वटेश्वराचा पुत्र आहेस. तुझे आणि वटेश्वराचे नाते, जसे कापुराचा रवा. कापुराचाच अंश असावा, तसे आहे. आता तुझा आणि माझा संवाद (ध्यान) देऊन ऐक. आपणच आपल्या तळहाताला मिठी द्यावी असा हा संवाद आहे.)

''मुख्य बोध - तत् त्वम् असि । अमृतस्य पुत्रः ।
आत्मा वै पुत्र नामासि । रवा जैसा कापुराचा - ममैव अंशः ।
तळहाता मिठी देणे - जशी मूठ मिटतांना''.

- विनोबा

ज्ञानदेवांनी 'चांगदेव पासष्टीत' 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा बोध दिला आहे. महाकाव्य छांदोग्य उपनिषदात आरूणी-श्वेतकेतूच्या संवादात आले आहे. श्वेतकेतु बारा वर्षे गुरुकुलात अध्ययन करून घरी परतला असता त्याच्या पित्याला म्हणजे आरुणीला त्याच्या मुद्रेवर विद्याग्रहणाचा अभिमान झळकलेला दिसला. तेव्हा आरुणीने

त्याला विचारले, ''श्वेतकेतो यन्नु सोम्य इदं महामना अनुचानमानी स्तब्धोऽसि । उत तमादेशमप्राक्ष्य:, येन अश्रुतं श्रुतं भवति, अमतं मतं, अविज्ञातं विज्ञातमिति'' ।।

(''हे श्वेतकेतु ! हा जो तू असा स्वत:ला मोठा समजणारा विद्वत्तेचा अभिमान असलेला, ताठरतलेला आहेस तू (तो) आदेश विचारलास का? ज्याने न ऐकलेले ऐकल्यासारखे होते; न चिंतिलेले चिंतिल्यासारखे होते, न जाणलेले जाणले जाते?'') श्वेतकेतूने विचारले ''कथं नु भगव: स आदेशो भवति?''(हे भगवन् ! तो आदेश कसा आहे.) त्यावर आरुणी म्हणाले,''यथा सोम्य एकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्यात् । वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् । एवं सोम्य स आदेशो भवति ।'' (हे सोम्य । जसे मातीच्या एका गोळयाचे ज्ञान झाले म्हणजे इतर सर्व मातीच्या वस्तूंचे ज्ञान होते, ज्याला 'विकार' म्हणजे कारण-भिन्न कार्य म्हणतात, ही एक भाषामात्र आहे. माती हेच सत्य आहे; हे सोम्य! हा असा तो आदेश आहे.) याच संवादात आरुणीने श्वेतकेतूला सांगितले, ''तत् त्वम् असि''(ते तूच आहेस). हे सामवेदीय महावाक्य आहे.

या वाक्यात 'तत्', 'त्वम्', 'असि' अशी तीन पदे आहेत. 'तत्' म्हणजे व्यक्त - अव्यक्त, दृश्य - अदृश्य, ज्ञात - अज्ञात अशा सर्व पदार्थात अंतर्भूत असणारे तसेच त्यांना व्यापून असणारे तत्त्व ! सर्व विश्व त्याचाच विस्तार आहे. मातीपासून बनलेल्या सर्व वस्तूत अंतर्बाह्य मातीच भरलेली असते. त्याचे आकार व उपयोग वेगवेगळे असले तरी ती मातीचीच वस्तू असते.

ज्ञानदेवांनी आतापर्यंतच्या ओव्यामधून तत् - तत्त्वाचे वर्णन केले आहे. ज्ञानदेव म्हणतात,'हे चांगदेवा तू त्या वटेश्वराचा पुत्र आहेस. कापुराच्या एका कणात कापुरच भरलेला असतो. त्याप्रमाणे तू त्या तत् - तत्त्वाचाच अंश आहेस.'

वटेश्वर चांगदेवांच्या गुरूचे नाव ! तसेच 'वटेश्वर' म्हणजे जगद्‌रूपी वटवृक्षाचे - अश्वत्थवृक्षाचे ऊर्ध्वमूळ ! हे दोन्ही अर्थ ओवीचा आशय प्रगट करतात. गुरू-शिष्याचे नाते हे एक विलक्षण रसायन आहे. त्यात मातृत्वाचा ओलावा, पितृत्वाचे आवरण आणि मैत्रीचा सुगंध असतो. गीतेतील कृष्णार्जुन संवादातून गुरूशिष्य नात्याचे अद्भुत दर्शन घडते; तसेच दर्शन सर्व औपनिषदिक संवादातून व चांगदेव पासष्टीतून अभिव्यक्त होते. 'तया पुत्र तूं वटेश्वराचा' हे चांगदेवाचे स्वरूपदर्शन ज्ञानदेवांनी त्यांना साक्षात घडविले. 'चांगया' या संबोधनातून ज्ञानदेवांनी चांगदेवा विषयीचा मातृत्वाचा जिव्हाळा प्रगट केला आहे तसेच 'चांगया' म्हणून अत्यंत स्नेहाने चांगदेवाशी जवळीक साधली आणि 'तुज मज आपणेयाचा बोल आइके' असे म्हणून चांगदेवाना पितृत्वाचे कवच पांघरले.

'तत्' या पदाने सत्-चित्-आनंद स्वरूप असणारे शाश्वत व नित्य स्फुरण पावणारे तत्त्व निर्देशित होते. विश्वातील सर्व पदार्थांना ते आधार आहे आणि त्याच्या स्फुरणाने ते सर्व पदार्थ प्रकाशित होतात. 'चांगया तू पुत्र, वटेश्वराचा' असे संबोधिण्यात, त्या तत्-तत्त्वाचाच तू आविर्भाव आहेस हे ज्ञानदेवांना सांगावयाचे आहे. 'अमृतस्य पुत्रः','आत्मा वै पुत्र नामासि' या उपनिषद वाक्यातून हीच संकल्पना व्यक्त होते.

परब्रह्माचे चैतन्यमय स्वरूप सर्व वस्तुमात्रात ओतप्रोत असते.परंतु अविद्येच्या उपाधीमुळे ते प्रतीत होत नाही अविद्येचे आवरण दूर होताच त्याचा साक्षात्कार होतो, या अद्वैत तत्त्वज्ञानाला अनुसरून केलेला हा उपदेश आहे. कापुराच्या प्रत्येक कणात कापूरच भरलेला असतो, त्या प्रमाणे तुझ्या-माझ्यात व सर्वदूर ते एक चैतन्यच भरून आहे.

⌘❖⌘

# १२. तळहाता तळी मिठी

तेया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा ।
चांगया ! तुज मजआपणे याचा । बोल आइके ॥१९(३७)

ज्ञानदेवो म्हणे । तुज माझा बोल आइकणें ।
तें तळहाता तळी मिठी देणें । जिया परी ॥ २०(३८)

या ओव्यांतून ज्ञानदेवांना चांगदेवाविषयी किती ममता होती हे दिसून येते. चांगदेव वयाने श्रेष्ठ होते त्यांचा सिद्ध पुरुष म्हणून मोठा लौकिक होता. त्यांचा शिष्य परिवारही बराच मोठा होता. त्यांच्या सिद्धींनी प्रभावित झालेला मोठा भक्तगण होता. त्यांचा हा लौकिक व अधिकार ज्ञानदेवांना अवगत होता. तेव्हा अशा ज्येष्ठ महात्म्याला ज्ञानदेवांनी 'चांगया' या एकेरी नावाने संबोधण्यामध्ये कोणताही उपमर्द नसून त्यातून ज्ञानदेवांची अपार करुणाच प्रगट होते आणि त्या करूणेच्या प्राप्तीची आर्तता चांगदेवात दिसून येते.

चांगदेवांनी ज्ञानदेवांना भेटायला जाण्यापूर्वी कोरा कागद पाठविला होता. असा कोरा कागद पाठविण्यामागे चांगदेवांचा कोणता उद्देश होता या संबंधी अनेक तर्क केले जातात. परंतु ज्ञानदेवांनी पासष्ट ओव्यातून चांगदेवांना उद्देशून जे विवेचन केले त्यावरून चांगदेवांना काय अभिप्रेत होते हे स्पष्ट दिसून येते. या पासष्ट ओव्या म्हणजे गुरूने आपल्या पात्रातील ज्ञानामृत शिष्याच्या पात्रात टाकणे

होय. गुरूने शिष्याला दिलेला हा अनुग्रह होय.

असा अनुग्रह असाधारण गुरू केवळ अधिकारी शिष्याला देतात. परंतु अधिकारी शिष्य असूनही भागत नाही त्याने गुरूला अनन्य भावाने शरण जावे लागते. ही शरणागती किंवा प्रपत्ती पारदर्शक असावी लागते. आपल्या चित्तावरील सर्व पूर्वसंस्कार त्याला धुवून काढावे लागतात. मन, चित्त व बुद्धी अहंकारवर्जित असावी लागते. चांगदेव स्वत:विद्वान होते, शास्त्रांचा व योगाचा त्यांनी प्रदीर्घ काळपर्यंत सखोल अभ्यास केला होता. परंतु हे सर्व विसरून, आपले पात्र पूर्ण रिकामे करून त्यांनी ज्ञानदेवांकडे अनुग्रहाची याचना केली. चांगदेवांनी ज्ञानदेवांना पाठविलेल्या कोऱ्या कागदाचे हे रहस्य आहे. अर्जुनाने श्रीकृष्णाकडे अशीच शरणागती पत्मकरली होती. हे ''शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्''. या त्याच्या वाक्यावरून स्पष्ट दिसून येते.

ज्ञानदेवांनी चांगदेवांना 'चांगया' म्हणून संबोधण्यात ज्ञानदेवांचा अधिकार आणि चांगदेवांची पात्रता सिद्ध होते. 'तुज मज आपणे याचा बोल आइके' या अवतरणाने ज्ञानदेवांनी चांगदेवाच्या मनातील गुज ओळखून त्यांना 'तू पुत्र वटेश्वराचा' हा बोध दिला. हा बोध 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा अनुवाद आहे. बह्मचैतन्याने सर्व विश्व साकारले आहे तेच तुझ्यात आहे असे बोधन त्यात आहे. ब्रह्म आणि आत्मा यांच्या एकसरी विलासाचे हे दर्शन आहे. 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा आरुणी-श्वेतकेतूच्या संवादात नऊ वेळा उच्चार झाला आहे. पुनरुच्चारण हे जपाचे सार आहे. पित्याने पुत्राला उपदेश देतांना त्याने दिलेल्या मंत्राचा न मिटणारा ठसा निर्माण करण्यासाठी केलेले हे पुनरुच्चारण आहे.पुनरुक्तीचा उपयोग सिद्धांताची महती पटविण्यासाठी करतात.

ज्ञानदेव पुढे म्हणतात, ''तुज माझा बोल ऐकणे ।
ते तळहाता तळी मिठी देणे । जिया परी ।''

गुरू शिष्याला उपदेश देतांना त्याचा हात आपल्या हातात घेतो. दोन तळवे एकमेकांना स्पर्श करतात. त्यात जी वैचारिक-भावनिक मिठी पडते ती खरोखर अलौकिक असते. त्यात परस्पर आलिंगनाचा आनंद असतो. एकात्मतेचे ते स्वरूप असते. या मिलनानंतर गुरू-शिष्य भाव लोपतो आणि त्याक्षणी विलक्षण अभेद निर्माण होतो. तसा अभेद ज्ञानदेव व चांगदेव यांच्यात उत्कर्ष पावलेला आढळून येतो.

विनोबांनी,''तळहाता तळी मिठी देण' - जशी मूठ मिटतांना'' असे वर्णन केले आहे. मूठ मिटतांना आपणच आपल्याला भेटत असतो. 'तत् त्वम् असि' किंवा ''तया पुत्र तू वटेश्वरांचा'' हा बोध म्हणजे आपण आपले चैतन्यमय स्वरूप जाणणे, अनुभवणे आणि त्यात निमग्न होणे. हा आत्मस्वरूपाचा साक्षात्कार आहे. ब्रह्मात्मैक्याची अनुभूती आहे. त्या स्थितीत सर्व उपाधींचा लोप होऊन निरालंब आनंदात प्रतिष्ठित होता येते. त्या स्थितीचे वर्णन करतांना शब्दाची आडकाठी येते. गंगौघाप्रमाणे आनंदाचा प्रवाह, दुथडी भरून सतत वाहत असतो. गुरूवाक्याचा हा परिणाम आहे.

⌘❖⌘

# १३. स्वादेचि स्वाद चाखिजे

ज्ञानदेवो म्हणे । तुज माझा बोल आइकणे ।
ते तळहाता तळी मिठी देणे । जियापरी २०(३८)

बोले चि बोल आइकिजे । स्वादे चि स्वाद चाखिजे ।
का उजिवडे देखिजे । उजेडा जेविं ॥२१(३९)

(ज्ञानदेव म्हणतात तुझा - माझा (हा) संवाद ऐकणे म्हणजे तळहाताला तळी मिठी देण्यासारखे आहे. बोलानेच बोलाला (शब्दाने शब्दाला) ऐकावे, स्वादानेच स्वाद चाखावा, उजेडाने उजेडाला पाहावे. अशा प्रकारचा हा संवाद आहे.)

गुरूशिष्यातील हा संवाद एक विलक्षण अनुभूती आहे. ते दोन जीवांचे अद्भुत मीलन आहे. पाण्यात पाणी टाकले म्हणजे जशी एकात्मता एक-रूपता निर्माण होते तशी ही साक्षात प्रतीती आहे. गुरू कोण, शिष्य कोण, हा भाव पूर्णतया तिथे नाहीसा होतो तिथे असते ती निखळ स्व-रूपता !

विनोबांनी 'तळहाता तळी मिठी देणे' म्हणजे स्वतःची मूठ मिटणे असा अभिप्राय दिला आहे. त्याचाच अर्थ गुरू, शिष्याला त्याच्या स्व-त्वाची ओळख पटवून देतो, असा आहे.

प्रत्येक व्यक्ती स्वतःभोवती आपले स्वतंत्र वर्तुळ तयार करीत

असते. 'मी' म्हणजे माझा देह, माझी इंद्रिये, माझे विचार, भावना, कर्तृत्व यांची तो आपल्या भोवती एक गोल रेखा आखून घेतो. व्यक्तिपरत्वे निर्माण होणारी ही अधिकाधिक मोठी होत जाणारी वलये असतात. अशा असंख्य वर्तुळांचा सर्व मानवी समाजाला वेढा पडलेला असतो. त्या वर्तुळांचा जेव्हा अनिवार्यपणे परस्पर-छेद होतो तेव्हा व्यक्ती-व्यक्तीमध्ये तणाव निर्माण होतो. त्यांतून स्पर्धा, संघर्ष, सत्तेची लालसा इत्यादि प्रवृत्ती वाढू लागतात. जाती-वर्ण, श्रेष्ठ-कनिष्ठ, श्रीमंत-गरीब, शोषण करणारा व शोषित असे असंख्य भेदभाव निर्माण होतात; जीवनाचे एक अत्यंत अभद्र व किळसवाणे असे दर्शन घडून येते.

वास्तविक सर्व भेदभाव मानवनिर्मित आहेत. मी अमुक आई वडिलाच्या पोटी जन्माला आलो ही एक आकस्मिक घटना आहे. 'मी' दुसऱ्या आई वडिलाच्या संबंधातून जन्म घेतला असता तरी त्या 'मी' मध्ये कोणताही फरक पडला नसता कारण हा 'मी' विश्वचैतन्याचा अंश आहे. पाण्याच्या प्रवाहात अगणित थेंबांचा समावेश असतो. प्रत्येक थेंबात द्रवत्व असतेच. कित्येक थेंब उष्णतेने वाफ होऊन विरल होत असले तरी त्यात आर्द्रता असतेच. किनाऱ्याच्या मातीला कित्येकांचा स्पर्श होऊन मातीला ओलावा मिळतो. कित्येक प्रवाहाबरोबर वाहत जाऊन सागराशी एकरूप होतात. त्यातही त्यांचे आर्द्रत्व असतेच. एकरूपतेचा हा अखंड प्रवाह अविरत सुरू आहे. असे असतांना सर्व भेदभाव मनोकल्पित आणि कृत्रिम आहेत, हे दर्शन गुरू शिष्याला घडवून देतो. सर्वात्मभावाचा एक नवीन उन्मेष त्यातून जागृत होतो.

बोलेचि बोल आइकिजे । स्वादेचि स्वाद चाखिजे ।
का उजिवडे देखिल । उजेडा जेवी ।।

या ओवीवर विनोबांनी खालील टीप दिली आहे.

''प्रश्न :		यत्र त्वस्य सर्व आत्मैवाभूत, तत्-

केन कं पश्येत्
केन कं रसयेत्
केन कं शृणुयात् ?

उत्तर :

तेनैव तं पश्यत्
तेनैव तं रसयेत्
तेनैव तं शृणुयात्''

हे उद्धरण बृहदारण्यकांतील याज्ञवल्क्य - मैत्रेयीच्या संवादात थोड्या फरकाने आले आहे. याज्ञवल्क्य, मैत्रेयीला बोध देतांना म्हणतात.

''यत्र हि द्वैतमिव भवति । तदितर इतरं पश्यति । तदितर इतरं शृणोति । तदितर इतरं विजानाति । यत्रत्वस्य सर्वं आत्मैवाभूत् । तत् केन कं पश्येत् । तत् केन कं शृणुयात् । तत् केन कं मन्वीत । तत् केन कं विजानीयात् । येनेदं सर्वं विजानाति, तं केन विजानीयात् । विज्ञातारमरे केन विजानीयात् ।''

(जिथे द्वैता सारखे असते तिथे अन्य अन्यास पाहतो, अन्य अन्यास ऐकतो, अन्य अन्याचे मनन करतो अन्य अन्यास जाणतो. जेव्हा सर्व आत्माच झाले तेव्हा कोण कुणाला पाहणार ? कोण कुणाला ऐकणार? कुणाचे कोण मनन करणार? कोण कुणाला जाणणार?

(साधक) ज्याने हे सर्व जाणतो? त्याला कशाने जाणावे? जाणणाराला कशाने जाणावे ?)

त्या सर्वात्मभावाचे ज्ञानदेवांनी केलेले हे अपूर्व वर्णन आहे.

शब्दांनी शब्द ऐकावा, स्वादाने स्वाद चाखावा, उजेडाने उजेडच पाहावा अशी ती अलौकिक अवस्था आहे. हे एक दिव्य व अद्भुत दर्शन आहे. एकरस संवित्तीचा तो अवतार आहे.

⌘❖⌘

# १४. सोनेया वरकलु सोने जैसा

सोनेया वरकलु सोने जैसा । कां मुखा मुख हो आरिसा ।
मज तुज संवाद तैसा । चक्रपाणी ॥ २२(४०)

गोडिये आपुली गोडी । घेता, काय न माये तोंडी?
आम्हा परस्परे आवडी । तो पाडु असे ॥ २३(४१)

(शुद्ध सोन्याची परीक्षा किंवा कसोटी (वरकल) शुद्ध सोनेच असते अथवा मुखानेच मुख बघायला आरसा व्हावे त्याप्रमाणे हे चक्रपाणी तुझा माझा संवाद आहे. गोडीने गोडी किती चाखावी याला कोणतेच माप नाही. तोंडात जितकी मावेल तितकी किंवा न मावेल तितकी ! आपला संवाद हा परस्परांच्या आवडीचा आहे त्याला माप कोणते देणार !)

ज्ञानदेवांनी चांगदेवांना 'तत् त्वम् असि' या महावाक्याचा बोध दिला. 'तत्' चे स्वरूप वर्णन केल्यानंतर 'त्वम्' म्हणजे 'तू' कसा आहेस याचे हे निरूपण आहे.

तुझ्यात आणि माझ्यात वास्तविक कोणताच फरक नाही, आपले स्वरूप एकच आहे. ते स्वरूप परिशुद्ध सोने आहे. त्यात हिणकसपणाचा लेशही नाही. आरशात आपण आपलेच मुख पाहतो तसेच तुझे आणि माझे एकरूपत्व आहे. हा दोन भिन्न व्यक्तीतील

संवाद नसून आपणच आपल्याशी केलेले हितगुज आहे. गोडीनेच गोडी किती चाखावी अशातला हा प्रकार आहे. अमर्याद आनंदाला आलेले हे उधाण आहे. त कधीच  संपत नाही. त्याचा आपण दोघेही प्रत्यय घेत आहोत.

ज्ञानदेव आणि चांगदेव हे दोघेही एकाच पातळीवरून त्या अनुपम आनंदाचा अनुभव घेत होते. चांगदेवांच्या मनातील संभ्रम पूर्णपणे निवळला होता. गढूळ पाण्यात तुरटीचा खडा फिरविल्यानंतर ते जसे शुद्ध पारदर्शक होते किंवा लोखंडाला परिसाचा स्पर्श झाल्यानंतर त्याचे बावनकशी सोने होते तसा गुरूबोधाने शिष्याच्या अंत:करणात आमूलाग्र बदल घडून येतो. त्याचे सर्व संभ्रम, विकल्पन, संशय विरून जातात आणि त्याच्या मुळात असलेल्या विशुद्ध चैतन्याची त्याला नवी जाण येते त्यावेळी गुरू आणि शिष्य हा भेद राहत नाही.

गुरूच्या मुखातून स्त्रवणारे हे अमृत पचनी पडण्यासाठी जिज्ञासा,अतूट श्रद्धा आणि तळमळ असावी लागते.  'तत् त्वम् असि' या महावाक्याचे छांदोग्य उपनिषदातील आरुणी - श्वेतकेतूच्या संवादात वारंवार उच्चारण करण्यात आले आहे. त्याचा उद्देश शिष्याची गुरूवाक्य श्रवण करण्याची पात्रता वाढवणे हा आहे. ती पात्रता सिद्ध करण्यासाठी आरुणीने जे अनेक दृष्टांत दिले त्यातील एक दृष्टांत गुरू शिष्याला कशाप्रकारचा बोध देतो यासंबंधीचा आहे. गांधार देशात राहणाऱ्या एका सधन व सज्जन माणसाला चोरांनी लुबाडले आणि त्याचे हातपाय बांधून व डोळयावर पट्टी लावून एका निबिड अरण्यात आणून सोडले. तो जसा तेथे पूर्वेकडे, उत्तरेकडे, पश्चिमेकडे अथवा दक्षिणेकडे तों करून ''आहो माझे डोळे बांधून मला आणला आहे व मला डोळे बांधून तसाच इथे ठेवला आहे''. असे मोठ्याने ओरडत व आक्रोश करीत असतो त्याप्रमाणे अज्ञानाची - अविद्येची - देहात्मभावाची पट्टी ज्याच्या डोळयांवर घट्ट बांधलेली असते असा जीव विभ्रमावस्थेत

असतो. त्याला जेव्हा या बद्धतेची जाणीव होते व आपण दिशाहीन झालो आहोत याची खात्री पटते तेव्हा त्याच्यामध्ये त्या अगतिक स्थितीतून बाहेर पडण्याची एक विलक्षण आर्तता, आंतरिक तळमळ निर्माण होते. अशावेळी गुरू त्यांच्या डोळयावरील पट्टी काढतो आणि त्याला सांगतो ''एतां दिशं गंधारा: एतां दिशं व्रज''(गंधारदेश इकडे आहे ह्या दिशेने तू जा'') या उपदेशाने पंडित व मेधावी झालेला तो पुरूष गंधार देशाचा मार्ग विचारीत विचारीत ह्या गावाहून त्या गावाला असा मार्ग आक्रमित गंधार देशाला जाऊन पोचतो (स: पण्डित: मेधावी ग्रामात् ग्रामं पृच्छन् गंधारान् एव उपसंपद्ययेत्)

गुरू शिष्याला केवळ दिशा दाखवतो. तो त्याला त्याची मुक्त व चैतन्यमय स्वरूपाची ओळख करून देतो. अज्ञानाच्या आवरणामुळे जो देहात्मभाव निर्माण झालेला असतो त्याचे निराकरण करतो. पुढचा प्रवास शिष्यालाच करावा लागतो. त्याला प्रत्येक मुक्कामावर पुढील मुक्कामाचा मार्ग स्वत: शोधावा लागतो. ते करताना 'परिपृच्छा' करावी लागते. अज्ञानाच्या वेगवेगळया पातळीवर उभे असणाऱ्यांना हा प्रयास करावा लागतो. ज्ञानदेवांनी जग तुमच्यापासून वेगळे नाही असा त्यांना साक्षात्कार घडविता क्षणीच चांगदेव ज्ञानदेवांच्या पायरीवर येऊन पोचले. त्यांच्या एकरूपतेचे ज्ञानदेवांनी वरील ओव्यातून अतिशय मधुर व काळजाचा ठाव घेणारे वर्णन केले आहे.

⌘❖⌘

## १५.परि न धरावे । मी पण हे

कांही करी बोले कल्पी । कां न करी न बोले न कल्पी ।

इये दोन्ही तूझा स्वरूपी । न घेती उमसू ।। २६(४४)

चांगया । तूझेनि नांवे। करणें न करणें नोहावें ।

हे काय म्हणो? परि न धरावे । मीपण हें ।।२७(४५)

(काही करणे, बोलणे, तसेच काही न करणे, न बोलणे किंवा विचार न करणे या दोन्ही गोष्टींचा तुझ्या (निर्विकार) स्व-रूपात उद्‌भव नाही. हे चांगया! तुझ्या मिषाने करणे किंवा न करणे हे घडू नये याला तरी काय म्हणावे? कारण या करण्यात किंवा न करण्यात 'मी' पण येणार)

ज्या ठिकाणी आत्यंतिक प्रेम आहे तिथे काही करणे, बोलणे, कल्पना करणे हेही सहन होत नाही तसेच न बोलणे न करणे, न विचार करणे हेही वृथाच आहे. मी म्हणावे 'मी' तुमच्या भेटीला येतो किंवा तुम्ही म्हणावे 'मी' तुमच्या भेटीला येतो यात केवळ 'मी' पणा असतो. परंतु आपणामध्ये 'मी' पणा तर विरून गेला आहे. तिथे शरीराची औपचारिक भेट तरी कशाला ? आत्म्याच्या परिशुद्ध

स्वरूपाचे हे निरूपण आहे.

आत्मा, अविकार, क्रियाशून्य आणि शाश्वत आहे. तो केवळ साक्षी आहे. तो संपूर्ण सत् -चित् - आनंदमय आहे. त्याच्याच सत्तेवर सर्व क्रिया प्रतीत होतात. शरीराच्या व अंत:करणाच्या माध्यमामुळे बोलतांना, हालचाल करतांना, विचार करतांना आत्माच हे सर्व करतो असा भास होतो परंतु तो तर निष्क्रिय आहे, म्हणजे या सगळया कर्मांचा त्याला लेप होत नाही. तो असंसर्गी आहे. पाण्यात पडलेले सूर्याचे प्रतिबिंब पाणी हालले तर हालल्यासारखे भासते परंतु त्यामुळे आकाशात असलेल्या सूर्याबिंबाला त्याचा सोस होत नाही. तो अ-संगच असतो. सोन्याचे अलंकार झाल्यामुळे सोने मूळ स्वरूपात कायमच असते. त्या अलंकारांना वेगवेगळी नामरूपे असली तरी सुवर्णाची कांती हरपत नाही जागृतावस्थेत इंद्रियांच्या साह्याने दृष्ट्रत्वादि व्यवहार होत असला तरी सुषुप्तीत ती इंद्रिये निद्रित असतात त्यावेळी कोणत्याही बाह्य किंवा आंतरिक घटनांची जाण नसते.

आत्म्याचे मूळ स्वरूप निष्क्रिय असले तरी ते संवित्तीने, जाणिवेने व्याप्त असते म्हणून सर्व व्यवहार तो तटस्थ निर्विकार राहून पाहू शकतो. दोन जीवांना आत्म्याने साक्षिरूप प्रतीत झाल्यानंतर त्यांच्यात कुठला व्यवहार होणार? त्यांचे परस्परमीलन कसे होणार ? दोन्ही परस्परांना साक्षी असल्यामुळे त्यांची एकात्मता कशी भंग होणार? शारीरिक, मानसिक व वैचारिक भेट ही केवळ निरर्थक उपचार ठरतात? एक दिवा दुसऱ्या दिव्याचे कोणते रूप पाहणार?

ज्ञानदेव म्हणतात बोलणे, किंवा न बोलणे, करणे किंवा न करणे, चिंतणे किंवा न चिंतणे यांचा उद्‌भव आत्मस्वरूपावर होत नाही. त्यांचा भाव किंवा अभाव हा उपाधिजन्य आहे. ही उपाधी शरीर, इंद्रिये व अंत:करणाची घडलेली आहे. करणे न करणे, बोलणे न बोलणे, विचार करणे न करणे हा सर्व कर्मभाग त्या उपाधीचा

आहे. तिच्या कार्याचा परिशुद्ध आत्मा केवळ साक्षी आहे. परंतु अहंकार किंवा 'मी' पणामुळे ते सर्व व्यवहार आत्म्याचेच आहेत असा भ्रम होतो. म्हणून ज्ञानदेव म्हणतात.

"परि न धरावे । मी पण हे" ।

विनोबांनी या दोन ओव्यांवर जी टीप दिली आहे ती अद्वैत तत्वज्ञान सूत्र-रूपाने सांगते.

" स्वरूप विरुद्ध रुप

कांही करे बोले कल्पी ---- कायावाचा-मनाची प्रवृत्ति ।

ह्या उलट तिहींची अप्रवृत्ति ।"

" चांगदेव-चांगला देव परिशुद्ध आत्मा ।

त्याच्या नांवाने प्रवृत्ति - अप्रवृत्ति दोन्ही कुंठित होतात ।

प्रवृत्तीची प्रतिक्रिया - अप्रवृत्ति, उभयातीत निवृत्ति ।

तेच आत्मस्वरूप ।"

शरीर, इंद्रिये व अंत:करण यांची स्वाभाविक प्रवृत्ती कर्म विवशता आहे. सर्व कर्मांना ते निमित्त आणि उपादान कारण आहेत. त्यातून प्रत्येक व्यक्तीचे एक भाव-विश्व साकारत असते. कित्येक वेळा या भाव विश्वातून उद्विग्नता (anguish) निर्माण होते तेव्हा प्रतिक्रियारूपी अ-प्रवृत्ती म्हणजे काही न करण्याची वृत्ती निर्माण होते. परंतु ती तात्कालिक असते. निश्चयपूर्वक काही न करण्याचा प्रयत्न केला तरी प्रवृत्ती उचंबळून कर्म-ओघात स्वाभाविकपणे ओढली जाते. दु:खाचे आघात पडले म्हणजे अप्रवृत्तीचा-अकर्माचा आश्रय घ्यावासा वाटतो, पण हे सुद्धा प्रवृत्तिपरच असते. 'प्रवृत्ति-अप्रवृत्ति' या दोन वृत्ती शरीर, इंद्रिये व अंत:करणाचे स्वभाव आहेत. त्यात जोरजबरी होऊ शकत

नाही हे जाणून त्याकडे तटस्थतेने साक्षिरूपाने पाहणे यातच निवृत्तीचे सार आहे. निवृत्ती म्हणजे निष्क्रियता किंवा पराङ्मुखता नव्हे तर वैश्विक घडामोडीचा सर्व कर्मविभाग हा अपरिहार्य आविष्कार आहे, हे जाणून त्यांच्याकडे केवळ पाहत राहणे आणि त्याच्या उच्चावचाचे दर्शन घेणे. हे समुद्राच्या किनाऱ्यावर बसून त्यावर उठणाऱ्या लाटांच्या क्रीडांचा निरामय आनंद घेण्यासारखे आहे. त्यात आत्म्याची अविचलता प्रतीत होते.

⌘❖⌘

# १६. लवण पाणियेचा ठावो

लवण पाणियाचा थावो । माजीं रिगौनि गेलें पाहों ।
तंव तें चि नाहीं, मा काय घेवों । मापजळा? ॥२८(४६)
तैसें तुज आत्मेयातें पाहों । देखो गेलिया मी चि नाही ।
तेथे तू कैचा काई । कल्पावेया ? ॥२९(४७)

(मीठाच्या खड्याने सागराचा ठाव घेण्यासाठी त्यात बुडून जावे तर तो (मीठाचा खडा) विरघळून जातो. मग त्याने त्या जलाशयाचे माप कसे घ्यायचे? जेव्हा मी तुला आत्मरूपाने पाहायला जातो तेव्हा स्वत:ला हारपून बसतो मग तेव्हा तू कसा दिसतोस याची कल्पना तरी कशी करणार ?)

रामकृष्ण परमहंसांनी शिष्यांबरोबर झालेल्या संवादात एक दृष्टांत दिला. मीठाच्या एका बाहुलीने मोठ्या दिमाखाने समुद्राचा तळ शोधण्यासाठी उडी घेतली. थोड्या वेळाने तिला जाण झाली की, तिचा 'मी' पणा पूर्णतया नाहीसा झाला. जिथे त्या वस्तूचे अस्तित्वच विरून जाते ती दुसऱ्या वस्तूंचे वेगळे स्वरूप कशी ओळखणार? ती तर स्वत:च स्वत:ला हारपून बसली. आत्मस्वरूपात प्रतिष्ठित झालेल्या व्यक्तीच्या सर्व अहंकारनिर्मित वेगवेगळया जाणीवा नाहीशा होतात. ती विश्वरूपाशी एकरस होते. तिथे 'मी' आणि इतर अशी स्थितीच राहत नाही.

ज्ञानदेव आत्मरूपाने चांगदेवांच्या मनाचा ठाव घ्यायला निघाले तो ते स्वत:लाच गमावून बसले. मग चांगदेवांचे वेगळे रूप त्यांना कसे कळणार? आत्मैक्यामध्ये अशी काही विलक्षण अनुभूती असते की, त्यात कोणताही दुजाभाव, पृथकत्व, वेगळेपणा राहातच नाही. असतो तो केवळ निरपेक्ष, निरुपम असा आनंद! सत् आणि चित् त्या आनंदात पूर्णपणे विरून जातात.

याठिकाणी ज्ञानदेवांनी स्वत:ला मीठाचा खडा संबोधिले असून चांगदेवांना ज्ञानसागर कल्पिले आहे. विनोबा म्हणतात, ''चांगदेवाला समुद्राची आणि स्वत:ला लवणाची उपमा देणाऱ्या ज्ञानदेवांची विनयशीलता अद्वैताला हि अलंकार झाली आहे.''

या ओवीत चांगदेवाच्या महत्तेचाच गौरव आहे. चांगदेवांना ''तत् त्वम् असि''। या महावाक्याचा बोध देता देता ज्ञानदेव इतके विनम्र झाले आहेत की त्यात गुरू-शिष्य, उपदेशक-उपासक, सख्यत्व, मातृत्व, पितृत्व, श्रेष्ठ-कनिष्ठत्व या सर्व भावांचा विलय होऊन त्यांनी चांगदेवांचे आणि त्यांचे साक्षात तादात्म्य अनुभवले. ही अद्वैतानुभूतीची परिसीमा आहे. त्याचे ज्ञानदेवांनी जे वर्णन केले आहे ते अद्वैत तत्त्वज्ञानाला अधिकच शोभा आणते. अलंकारांनी देहाची शोभा फाकते. लवण-सागराच्या दृष्टांताने, ज्ञानदेवांच्या दृष्टीने त्यांची चांगदेवांशी किती एकरूपता निर्माण झाली होती, याचे अत्यंत विलोभनीय दर्शन घडते.

''तुझे स्वरप जेव्हा मी पाहतो तेव्हा माझे 'मी' पण विरून जाते. मग तुझ्या रूपाची मला जाण कशी येणार ?'' असा प्रश्न ज्ञानदेवांनी स्वत:ला विचारला.

आत्मतत्त्वाचे व त्याचे विश्वरूपाशी असणारे ऐक्य याचे निरूपण केल्यानंतर ज्ञानदेव-चांगदेव यांच्या भेटीचे प्रयोजन उरले नाही असे ज्ञानदेवांनी सुचविले आहे. ज्ञानदेव-चांगदेवांच्या भेटीच्या

अनेक सुरस कथा प्रस्तुत आहेत. पण ज्ञानदेवांनी चांगदेव-पासष्टीत जे विवरण केले त्यानंतर अशा भेटीचा उपचारही उरत नाही.

एकदा दहा भाविक तीर्थ-यात्रेला निघाले. रस्त्यात अत्यंत ओघाने वाहणाऱ्या नदीतून जाण्याचा त्यांना प्रसंग आला. ते सगळे जीव मुठीत धरून कसे बसे किनाऱ्यावर पोचले. त्यावेळी त्यांच्या मनात संशय निर्माण झाला की आपण दहाही सहयात्री सुरक्षित आहोत की आपल्यापैकी कोणी प्रवाहाबरोबर वाहत गेला ? म्हणून त्यांनी आपल्या सहकाऱ्यांची गणना सुरू केली. प्रत्येकजण स्वतःला सोडून इतरांना मोजत होता. या गणनेमधून त्यांना आपण नऊच जण आहोत असा भास झाला. त्यांच्यापैकी कोणीतरी एक नाहीसा झाला असावा अशा समजुतीने त्यांनी आक्रोश करायला सुरूवात केली त्यावेळी तिथून जाणाऱ्या एका महात्म्याने त्यांना आक्रोशाचे कारण विचारले तेव्हा त्यांनी घडलेली हकीकत त्याला सांगितली. त्यांच्या गोंधळाचे कारण त्या महात्म्याच्या लक्षात आले. तेव्हा त्याने त्यांच्यापैकी एकाला त्या सर्वांची पुन्हा गणना करायला लावली. त्याने स्वतःला वगळले आणि आम्ही नऊच सहकारी आहोत असे म्हणाला, तेव्हा तो महात्मा मोजणाऱ्याला उद्देशून म्हणाला "त्वं दशमः असि" "अरे तो दहावा माणूस तूच आहेस." आपल्याहून सर्व बाह्य विश्व वेगळे आहे असे आपण समजतो आणि महात्मा आपल्याला सांगतो तुझ्यासकट सर्व विश्व एकच समग्रव्यूह आहे तेव्हा तू अज्ञानाने वेगळे आहे असा विचार करीत होतास. गुरूबोध आपल्याला आपला आणि विश्वाचा अभेद आहे याचा साक्षात्कार घडवून आणतो पण तसा साक्षात्कार झाल्यानंतर 'मी-तू' पणा राहत नाही आणि सर्वत्र 'एकसरी' स्वरूप प्रत्ययास येते. चांगदेवांच्या भेटीची ज्ञानदेवांना उत्कंठा असली तरी प्रत्यक्ष भेटीची निरर्थकताच त्यांनी दर्शविली आहे.

⌘❖⌘

# १७. सिद्ध-भेटि विसकुसे

सखया ! तूझे नि दोसें । भेटावया जीव उल्लासे ।

कीं सिद्ध-भेटि विसकुसे । अैसिया बिहे ॥२४(४२)

घेवों पाहें तुझें दर्शन । तंव रूपा येवों पाहे मन ।

तेथे दर्शना होये अवजतन । ऐसें गमो लागे ॥२५(४३)

(हे सख्या ! तुला भेटण्यासाठी (माझा) जीव उल्हसित झाला आहे. (पण) मला भीती वाटते की, त्यामुळे (आपली) सिद्धभेट विसकटणार तर नाही? तुझे दर्शन घडताच माझे मन वेगळेच रूप धारण करील (आणि) त्यामुळे (कदाचित) त्या दर्शनाचे अवजतन होईल असे मला वाटते. म्हणजे दर्शनाच्या इच्छेचेच जतन होणार नाही.)

या ओव्यांना अमृताचा स्पर्श आहे. दूरदेशी असलेला मित्र गावी परत येत असता त्याच्या भेटीची जशी आतुरता असते तसेच तो कसा दिसेल, त्याच्याशी प्रत्यक्ष भेटीत काय बोलता येईल, तो बदलला असेल तसेच त्याला आपणही बदललेले दिसू अशा स्थितीत त्याचे आपले भाव-मीलन कसे होईल अशा एक ना अनेक शंका दाटून येतात त्या सर्व भावनांना दिलेले हे शब्दरूप आहे.

ज्ञानदेवांनी चांगदेवाला 'सखया' म्हणून संबोधिले आहे. उत्कट

भावांपैकी सख्य-भाव हा अगदी वेगळया कोटीत पडतो. तिथे कशाचीही अपेक्षा नसते. असते ते केवळ प्रेम ! मैत्रीमध्ये पारदर्शमता असते. ओलावा असतो, जिव्हाळा असतो, समरसता असते, निरागस वार्तालाप असतो. तिथे एकाचे मन दुसरा पूर्णपणे ओळखत असतो. परस्परांमध्ये एक विलक्षण ओढ असते. हे सगळे असले तरी एक प्रकारची धास्ती मनात निर्माण होते. पूर्वीसारखा संवाद साधता येईल की, नाही असा तर्क मनात उठतो. ज्या उंच पातळीवरून ज्ञानदेव चांगदेवांशी बोलणे करीत होते त्यात प्रत्यक्ष भेटीने अंतर तर पडणार नाही असे पाल चुकचुकल्यासारखे त्यांना वाटू लागले. या सगळया भावनांचे अत्यंत मर्मस्पर्शी दर्शन वरील ओव्यातून प्रतीत होते.

सिद्ध-भेट म्हणजे दोन सिद्ध व्यक्तींचे आलिंगन ! 'तत् त्वम् असि' (ते तूच आहेस) या महावाक्याचा बोध चांगदेव पासष्टीतून ज्ञानदेवांना द्यायचा आहे. तू आणि मी एकाच चैतन्याचा अंश आहोत, तुझ्यात आणि माझ्यात स्वरूपत: कोणताही भेद नाही असे ज्या पातळीवरून ज्ञानदेव सांगत होते त्यावेळी प्रत्यक्ष व्यवहारात ज्ञानदेव आणि चांगदेव या दोन वेगळया व्यक्ती आहेत, त्यांची भाव-विश्वे भिन्न आहेत याची आठवण ज्ञानदेवांना होऊन प्रत्यक्ष भेटीत कसा व्यवहार होईल याची त्यांना एक प्रकारची काळजी वाटू लागली असावी. पारमार्थिक पातळीवरून जो विचार आपण करतो त्याची व्यावहारिक पातळीवर घडी तर विसकटणार नाही अशी चिंता त्यांच्या मनाला चाटून जाते आणि म्हणून ते म्हणतात, ''की, सिद्ध-भेटि विसकुसे । ऐसिया बिहे ।'' तुझ्या दर्शनासाठी आतुरता असली तरी त्यावेळी माझे मन वेगळे रूप तर नाही धारण करणार, असे मला वाटत आहे. कदाचित् , व्यावहारिक पातळीवर आपले भावविश्व वेगळे असेल आणि मग आपल्या सिद्ध-भेटीत अडथळा येईल. तेव्हा या भेटीचा तरी उपचार कशाला ?''

निरुपचार प्रेमा । विषय होय जे वीरोत्तमा ।

ते दुजे नव्हे की आत्मा । ऐसे चि जाणावे.''

(ज्ञानेश्वरी - १८.१३४६)

ज्ञानदेवांनी आपल्या 'जीवीचे गुज' चांगदेवांना सांगितल्यानंतर प्रत्यक्ष भेटीचा केवळ उपचार ठरेल असे त्यांना वाटले असावे. जे निरुपचार म्हणजे निखळ प्रेम असते तेच आत्म्याचे स्वरूप आहे, असे प्रतीत झाले म्हणजे एकमेकांना शरीराची औपचारिक भेट घेण्याचे कारणच उरत नाही. या साक्षात्काराची महतीच अशी आहे की तिथे सर्व व्यवहार गळून पडतो. विनोबा त्यांच्या टीपेत लिहितात ''आत्यंतिक प्रेम सक्रियता सहन करीत नाही । भेटीचाही उपचार ठरू पाहतो. स्थूल किंवा बाह्य दर्शनाची हौस बाळगण्यात आंतरिक (वस्तु) दर्शनाची हेळसांड केल्या-सारखे होते.''

⌘❖⌘

# १८. दर्पण-व्याजे दिसते देखते जेवि

आता मी तूं या उपाधि। ग्रासौनि भेटि नुसधी ।

ते भोगिली अनुवादी । घोळ घोळूं ।।३०(५३)

रुचितेयाचेनि मिसें । रुचितें जेविजे जैसें ।

कां दर्पण-व्याजें दिसते । देखतें जेंवि ।।३१(५४)

(आता 'मी','तू' या उपाधी गिळून आपली जी भेट होत आहे ती निव्वळ आपल्या (शब्दांचा)आपणच अनुवाद करावा आणि त्याचा वारंवार विचार करावा (अशी प्रकारची आहे.)

जेवणारा आपल्या आवडीचे पदार्थ पाहून जेवून तृप्त होतो किंवा दर्पणाच्या (आरशाच्या) साह्याने आपणच आपले रूप पाहतो तशी ही भेट आहे.)

आत्मज्ञान किंवा आत्मप्रचितीचे स्वरूप कसे असते हे ज्ञानदेव चांगदेवांना सांगत आहेत. आपल्या जीवनप्रवासाला प्रारंभ झाल्यापासून संवित्तीचा प्रवाह सुरू असतो. मातेच्या गर्भात असल्यापासून आपल्यावर वेगवेगळे संस्कार होत असतात. मातेपासून आपल्याला सर्व प्रकारचे पोषणे मिळते, आपली वाढ होत असते, वेगवेगळे अवयव तयार होत असतात त्यांच्या कार्यांनाही प्रारंभ होत असतो. गर्भात होणाऱ्या आपल्या वाढीची मातेला जाण असते. तिला त्या वाढीची निरंतर संवेदना होत असते. तिच्या माध्यमातून बाहेरील विश्वाचा सूक्ष्म

अनुभव येत असतो.

आपली धारणा होतांना आई-वडिलांच्यामध्ये असणारे आनुवंशिक जीन्स आपल्यामध्ये उतरतात त्यांचा एक जैविक संकेत (Genetic Code) असतो. आपली भौतिक वाढ त्या संकेतामधून होत असते  परंतु त्याही अवस्थेत जे अंत:करण सूक्ष्म रूपाने अवस्थित असते ते विविध प्रकारचे संस्कार ग्रहण करीत असते. त्यातून एक नवीन व्यक्तित्व साकारत असते. आपण मातेच्या उदरातून बाहेर आल्यावर आपल्या सभोवतालच्या जगताचे आपल्याला भान होते त्यांचा एक ठसा क्षणोक्षणी उमटत असतो त्यातून इतरांपासून भिन्न असणारे असे वैशिष्ट्य प्रकट होत असते. या सगळया प्रक्रिया अविरत सुरू असतात. त्यातूनच 'मी हा अहंकार किंवा 'माझे' वेगळे अस्तित्व भासू लागते.

माझ्याहून बाकी सर्व वेगळे आहेत, त्यांचे माझ्याशी आई, वडील, भाऊ बहीण, चुलते मामे इत्यादि विविध प्रकारचे नातेगोते असते याची जाणीव होते. ही नातीगोती, मित्रमेळावा, समान विचारांचा सहभाग, विरोधी विचारांचा विरोध किंवा त्याविषयी उदासीनपणा इत्यादि वेगवेगळे भाव तयार होतात. त्यातून चांगला-वाईट, ग्राह्य-त्याज्य, खरे-खोटे यांच्या संकल्पना मूळ धरू लागतात. पृथक् अस्तित्वाचा (Ego) हा आविष्कार आहे.

परंतु जरा खोल विचार केला तर हा सगळा भास किंवा भ्रम असल्याची प्रतीती येते. कारण मी जसा वागतो तसेच इतरही वागतात. मला इतरांचे आकलन होते तसेच माझेही त्यांना आकलन होत असते. माझ्या शरीरिक गरजा आणि इतरांच्या शारीरिक गरजा यात फारसा भेद नसतो. विचार करण्याची क्षमता त्यांच्यातही माझ्याच सारखी असते. माझ्या आणि त्यांच्या ज्ञानप्रक्रियेत कोणताच फरक नसतो. अशावेळी जो भेद जाणवतो तो केवळ आभासिक आहे.

स्वरूपत: सर्व एकच आहे. एकच चैतन्य सर्व वस्तुतून प्रतीत होत असते. श्रवण केलेल्या या उपदेशाने त्याची प्रत्यक्ष प्रचिती येते त्यावेळी 'मी-तू-पणा' हा निरर्थक आहे. व्यावहारिक पातळीवरील हा भेद पारमार्थिक पातळीवर राहत नाही. ज्याचे भान होत असते ती केवळ क्रिया-शून्य स्वरूपता!

चांगदेवांना त्यांच्या कोऱ्या पत्राचे उत्तर देतांना ज्ञानदेव म्हणतात सर्व उपाधींचा ग्रास करून एकसरी संवित्ती आत्मज्ञानाच्या रूपाने स्फुरत असते परंतु त्या एकसरी संवित्तीचा आपल्याला बोध नसतो. गुरूप्रसादाने हा बोध झाला म्हणजे निखळ समरसता निर्माण होते. एकजिनसी ज्ञानप्रवाह दुथडी भरून वाहू लागतो. अशावेळी शब्दांचे प्रयोजन उरत नाही. संवाद मावळून जातो. असते ते केवळ मौन-मनन ! त्याचे वारंवार होणारे स्पंदन केवळ आनंदमय असते. तो आनंद कितीही भोगला तरी संपत नाही. विनोबांच्या भाषेत ''अद्वैत'' ही प्रेमाची परिसीमा आहे. तिथे द्रष्टा-दृश्य, जीव-शीव, एक जीव दुसरा जीव यांचा सर्वस्वी अ-भेद असतो.''

जेवणाराच्या रुचीचे पदार्थ असले तर त्याने तृप्त होईपर्यंत खावे. आरशामध्ये आपलेच रूप आपण पाहावे, अशी ही अवस्था आहे. जिथे सर्व भेद मावळतात, तिथे कोणी कोणाला भेटावे, कोणी कोणाशी संवाद साधावा कोणी कोणाला पाहावे ?

⌘❖⌘

# १९. मौनाची अक्षरे भली

तैसी अ-प्रमेयें प्रमेयें भरली । मौनाची अक्षरें भली ।
रचौनि गोठी केली । मेळियेची ॥३२(५५)

इयते करोनि व्याज । तूं आपणे याते बुझ ।
दीप दीपपणे पाहे निज । आपुलें जैसें ॥३३(५६)

(ज्याप्रमाणे अ-प्रमेय प्रमेयांनी भरला असतो त्याप्रमाणे मौनात सर्व अक्षरे (शब्द) दडलेली असतात. मौनात त्या सर्व अक्षरांचा मेळ झाला असतो. हे तू नीट ध्यानात ठेव. जसा दिवा आपल्या प्रकाशाने आपल्यालाच पाहत असतो तसे तू आपल्या निज-(स्वरूपाला) पाहा.)

या ओव्यातून ज्ञानदेवांनी एका अतिशय एका अतिशय उंच पातळीवरून त्यांचा विचार मांडला आहे. चांगदेवांनी ज्ञानदेवांकडे कोरा कागद पाठवून मौन धारण केले. मौन म्हणजे काहीही न बोलणे. परंतु कोरा कागद पाठवितांना मी तुम्हाला शरण आलो आहे. माझी विद्वत्ता, माझा सिद्धयोगाचा अभ्यास व त्यातून प्राप्त झालेल्या सर्व सिद्धी मी मिटवून टाकल्या आहेत. माझ्याजवळ तुम्हाला सांगण्यासारखे काही नाही. माझी पाटी कोरीकरकरीत आहे. माझे मन विचारशून्य आहे. त्यावर तुम्हाला जे अंकित करावयाचे आहे ते तुम्ही खुशाल करा, असा भाव प्रगट केला आहे. परंतु या मौनालाही अक्षरांचे, शब्दांचे लेणे आहे. ते त्या मौनामधूनच अभिव्यक्त होते, अशी

शरणागती असल्याशिवाय कोणताही शाश्वत बोध होऊ शकत नाही.

चांगदेव पासष्टीतून ज्ञानदेवांना बोध द्यावयाचा होता. चांगदेवांना जे अ-प्रमेय होते त्याची प्रचिती करून द्यावयाची होती; ती प्रचिती ज्या परम तत्त्वाची होती ते कोणत्याही प्रमाणांनी सिद्ध होणारे प्रमेय नव्हते. जिथे सर्व शब्द लटके पडतात, त्या आत्म-वस्तूचा बोध हा शब्दांच्या, सिद्धांताच्या माध्यमातून कसा व्हावा ? सर्व शब्द कोणतातरी अर्थ प्रगट करण्याकरिता असतात. परंतु जे सर्व अर्थांच्या पलीकडे आहे असे आत्मतत्त्व शब्दांच्या माध्यमातून कसे कळणार ?

कोणत्याही विचाराला शब्दरूप दिल्याबरोबर एक स्वाभाविक मर्यादा निर्माण होते. ''पाणी'' शब्द उच्चारल्यावर जे द्रवरूप नाही अशा सर्व पदार्थांचा निषेध होतो. शब्दाला संकेत रूपी अर्थांची मर्यादा येते.

गुरू शिष्याला अक्षरातून-शब्दातून बोध देतात पण त्याचबरोबर जे शब्दातून व्यक्त करता येत नाही पण ज्याचा आशय शब्दांची सीमा ओलांडून ग्रहण करावयाचा असतो तिकडे शिष्याचे लक्ष वेधतात. हा वेध वेधण्याचे शब्द माध्यम असते परंतु तो वेध मौनाने म्हणजेच मननाने घ्यावयाचा असतो. हे मनन म्हणजे तर्कशुद्ध विचार नसून अतींद्रिय ज्ञान आहे. ते गुरूवाक्याने कळते. चांगदेव मौन धरतात म्हणजे बोलत नाहीत. ज्ञानदेव बोलूनही मौनी असतात म्हणजे बोलणे हा एक उपचार आहे याची चांगदेवांना जाणीव करून देतात. व्यक्तातून अ-व्यक्तात जाण्याची ही प्रक्रिया आहे.

'रचौनि गोठी केली मेळियाची । मौनाची अक्षरे भली' । या ओवीवर टीप देतांना विनोबा लिहितात, ''चांगदेव मौनाने बोलू पाहतो । ज्ञानदेव बोलूनहि मौन राखतो । अकर्मी कर्म, कर्मी अकर्म ।''

विनाबांची ही टीप गूढार्थांनी भरली आहे. चांगदेवांच्या मनात

जे आहे ते ते बोलत नाहीत. परंतु ज्ञानदेवांनी शब्दाश्रय घेऊनही आपले मौन कायम राखले आहे असा भावार्थ आहे. ज्ञानी पुरूष जेव्हा स्व-रूपात म्हणजे आपल्या चिरंतन अशा एकसरी जाणिवेत मग्न असतो तेव्हा तो 'क्रिया-शून्य' असतो व्यावहारिक पातळीवर तो 'अ-क्रिय' असतो पण त्याहीवेळी त्याच्या सर्व वृत्तींचे आत्मस्वरूपाशी तादात्म्य झाले असते. बाह्य विषयांकडे धाव घेणाऱ्या सर्व वृत्तींचे आत्मस्वरूपाशी ऐक्य असते. हे सुद्धा अकर्मातील कर्म असते. त्यावेळी सर्व वृत्ती शांत झालेल्या असतात, आत्मानुभवात त्या समरस होतात. कर्मात अकर्म पाहाणे म्हणजे जी कर्मे तो करतो ती अवश्यंभावी किंवा अनिवार्य असली तरी त्याची त्यात आसक्ती नसते. त्यामुळे त्याची अकर्मावस्था विचलित होत नाही.

अप्रमेय म्हणजे कोणत्याही प्रमाणांना विषय न होणारे असे तत्त्व ! त्यालाच परमात्मा, परमेश्वर, परब्रह्म, आत्मा, संवित्ती इत्यादि नावे आहेत. लौकिक व्यवहारांत किंवा सामान्य ज्ञान प्रक्रियेत साधारणपणे सहा प्रमाणे मानतात - १) प्रत्यक्ष २) अनुमान ३) उपमान ४) शब्द ५) अर्थापत्ति ६) अनुपलब्धि, ही प्रमाणे ज्ञान मिळविण्याची साधने (Means of Knowledge) आहेत. या सर्व प्रमाणांचा आत्मतत्त्वाचा बोध होण्यासाठी उपयोग केला जातो. त्यांच्या साह्याने आत्मतत्त्वाचा निर्देश होतो. परंतु आत्मतत्त्व त्यांनी लक्षित होत असले तरी त्यात समरस होण्यासाठी ज्या साधनांच्या साह्याने त्याचे परोक्ष रूप कळते ती सर्व साधने त्यागावी लागतात. तिथे राहते ते केवळ मौन, शब्द-शून्य अवस्था; सर्व वृत्तींचा विराम ! ती असते स्व-रूपता ।

विनोबा म्हणतात,

''अ-प्रमेय - प्रमातृ-स्वरूप प्रमेय
म्हणून प्रमातीत प्रमेय'' ।



विनोबांचे हे अवतरण साधनेची फलश्रुती दाखवते. लहान

मूल पांगुळगाड्याच्या साह्याने चालायला शिकते पण शेवटी पांगुळगाडा सोडून स्वत:च चालते. असा हा प्रकार आहे.

आपले आत्मस्वरूप ज्ञानमात्रता आहे परंतु ते समजून घेण्यासाठी शब्दरूपी ज्ञानसाधनांचा उपयोग करणे अनिवार्य असते. परंतु जेव्हा साक्षात् स्वरूपाची प्रचिती येते तिथे शब्दांची अडगळच होते. लक्षण हे निदर्शक असते. लक्षणालाच लक्ष्य मानणे म्हणजे सोपानालाच चिकटून राहण्यासारखे आहे. सोपानाचा उपयोग अवश्य आहे पण त्यात गुंतून पडण्यात लक्ष-प्राप्ती दुरावते. त्या स्थितीत मौन हीच सर्वार्थ अवस्था आहे.

'अ-प्रमेये प्रमेये भरली' या ओवीचा अर्थ जे अप्रमेय ब्रह्म किंवा संवित्ती आहे त्यात सर्व प्रमेयांचा अथवा ज्ञेयवस्तूंचा, ज्ञात-अज्ञात अशा सर्व पदार्थांचा समावेश होतो, कारण ते सर्वांना व्यापून आहे. परंतु त्याने ते परिमित म्हणजे लौकिक किंवा व्यावहारिक ज्ञानाच्या कक्षेत येत नाही. व्यापक वस्तू व्याप्याहून विशाल असते तिथे सर्व प्रमेयांचा, सिद्धांतांचा, समस्त भेदांचा लोप होतो. ते स्वरूप अनिर्वचनीय, अचिंत्य असे आहे. प्रमेय म्हणजे जे प्रकर्षाने मेय किंवा माप्य आहे. जिथे सर्व मापदंड थोटके पडतात ती अवस्था म्हणजे 'दीपाने दीपपणे पहाणे' उजेडाने उजेडालाच पाहाणे, नादाने नादालाच ऐकणे अशी आहे.

⌘❖⌘

# २०. वेद्य-वेदकत्वाहि अतीती

ज्ञानदेवो म्हणे नामरूपे- । विण तुझे साच आहे आपणपे ।
ते स्वानंद-जीवनापें । सुखिया होई ।। ३४(५९)
चांगया! पुढती पुढती । घरा आलिया ज्ञान-संपत्ति ।
वेद्य-वेदकत्वा हि अतीतीं । पदी बैसें । ३५(६०)

(ज्ञानदेव म्हणतात नाम-रुपाशिवाय जे तुझे आत्म-स्वरूप आहे तेच तुझे खरे सर्वस्व आहे. स्वानंद-जीवनाचा तोच सखा आहे.

चांगया! हे जाणून (अशी) ज्ञानसंपत्ती तुला यथाक्रम प्राप्त होईल की, त्याच्या साह्याने ज्ञेय-ज्ञाता (वेद्य-वेदक) यांच्या पलीकडे असलेल्या पदाला तू पोचशील)

ज्ञानदेवांनी आतापर्यंत 'तत् त्वम् असि' या महावाक्यातील तिन्ही पदांचा भावार्थ निरूपिला आहे. 'तत्' म्हणजे तुझ्या मूळ स्वरूपाहून वेगळे भासणारे विश्व. 'त्वम् असि' म्हणजे ज्या विश्वाच्या वेगळेपणाचा केवळ भास होतो व तो खरा आहे असे समजून तू वागतोस ते पारमार्थिक दृष्ट्या तुझ्याहून वेगळे नाही. विश्वाचे आणि तुझे एकच स्वरूप आहे. त्यात कोणताही भेद नाही; ''ते तूच आहेस''

विविधतेच्या झगमगाटात त्याचा तुला बोध होत नव्हता. तुझ्या डोळयांवर जी अज्ञानाची पट्टी होती ती मी आता काढली आहे. यापुढे तू निर्दोष दृष्टीने पाहून त्याचे यथाक्रम (पुढती पुढती) आकलन

कर म्हणजे तुला बाह्य विश्व आणि तुझे शुद्ध स्वरूप यात मुळात असलेले तादात्म्य, ऐक्य, एकसरता अनुभवाला येईल. ही अनुभूती येताच ज्ञाता-ज्ञेय ही द्वंद्वात्मक अवस्था आपोआप विरून जाईल.

ज्ञानदेवांचे अवतार कार्य इ. स. १२७५ ते १२९६ या अवघ्या एकवीस वर्षात पूर्ण झाले अशी सर्वसाधारणपणे मान्यता आहे. ज्ञानदेवांनी त्यांच्या तत्त्वज्ञानाची उभारणी भगवद्पाद आद्य शंकराचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाच्या पायावर केली असली तरी त्यात त्याकाळी प्रसृत असणाऱ्या इतर विचारधारांचाही समन्वय आढळतो. काश्मिरी शैव संप्रदाय, नाथ संप्रदाय, भागवत संप्रदाय इत्यादि मतांचा त्यांनी वेध घेतल्याचे दिसून येते. सांख्य-योग, न्याय-वैशेषिक, पूर्व मीमांसा-उत्तर मीमांसा, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, भगवद्गीता यातील सगळया विचारांचा त्यांनी विमर्श घेतला, हे ज्ञानदेवांच्या श्रेष्ठत्वाचे द्योतक आहे. त्यांच्या कोणत्याही ग्रंथात परमताविषयीचा अनादर आढळून येत नाही. विविधतेत एकता शोधण्याची त्यांची दृष्टी होती या दृष्टीचाच उन्मेष पुढील भाष्यकारांनी केला.

भारती तीर्थ हे इ. स. १३२८ ते १३८० या कालावधीत शृंगेरी मठाचे मठाधीश होते. सुप्रसिद्ध 'पंचदशी' या ग्रंथाचे जनक विद्यारण्य स्वामींचे भारती तीर्थ गुरू होते असा समज आहे. भारती-तीर्थ हे ''दृग्-दृश्य-विवेक'' या भाष्याचे लेखक असावे अशी धारणा आहे. 'तत् त्वम् असि' म्हणजेच दृश्य आणि द्रष्टा यांच्यातील ऐक्य याचे अतिशय तर्कशुद्ध विश्लेषण दृग्-दृश्य-विवेक या ग्रंथात केलेले आहे.

''रूप जाणले जाते ते जाणणारा डोळा आहे. डोळयाने ग्रहण केलेले दृश्य मनात जाणले जाते, डोळयाला जाणणारे मन आहे. मनाचा वृत्तिरूपी व्यापार जाणला जातो आणि तो जाणणारे साक्षि-चैतन्य असते. साक्षि-चैतन्याला जाणणारा (वेगळा) कोणीच नसतो.''

“नानाविध रंग, स्थूल-सूक्ष्म आकार, वस्तूची तीव्रता-बोथटपणा इत्यादि सर्व प्रकारचे धर्म डोळा पाहतो, परंतु डोळयाचे अंधत्व किंवा मंदत्व हे धर्म मनाला समजतात. मनाला हे सर्व समजते कारण ते एकघन (एकधा) (Unity) आहे. हाच न्याय श्रोत्र, त्वचादि ज्ञानेंद्रिये यांना लागू आहे.” “काम, संकल्प, संशय, श्रद्धा-अश्रद्धा, धृती-अधृती, विनय, बुद्धीचे कार्य, भय-लज्जा इत्यादि सर्व मनोभावना संवित्ती, चिती किंवा जाणीव (Consciousness) प्रकाशित करते, कारण ही संवित्ती, चिती किंवा जाणीव एकघन (Unity) आहे.”

“ही एकघन संवित्ती, चिती किंवा जाणीव (नव्याने) उत्पन्न होत नाही किंवा लय पावत नाही. (न उदेति न अस्तं एति), ती वाढत नाही किंवा घटत नाही. ती स्वयंप्रकाशी आहे. (स्वयंविभाति). कोणत्याही साधनावाचून ती इतर सर्व वस्तूंना प्रकाशित (भासयेत्) करते.” (दृग् -दृश्य-विवेक-श्लो, १ ते ५ चा स्वैर अनुवाद)

संवित्तीचे भारती-तीर्थ यांनी केलेले वर्णन ज्ञानदेवांनी चांगदेव पासष्टीत केलेल्या तत्त्वविवेचनाला अनुसरून आहे. भारतीय इतिहासात बाराव्या शतकापासून पंधराव्या शतकापर्यंतचा कालखंड सुवर्ण-अक्षरांनी लिहिण्यासारखा उज्ज्वल आहे. सर्व क्षेत्रातील विचारांची एक उत्तुंग झेप त्यात प्रतीत होते. “स्वस्ति श्री वटेशु । जो लपौनि जगदाभासु । दावी, मग ग्रासु । प्रगटला” या ओवीपासून तो “इयेते करौनि व्याज । तुं आपणेयाते बुज । दीप दीपपणें पाहे निज । आपुले जैसे” या ओवीपर्यंतच्या ६० ओव्यातून ज्ञानदेवांनी ‘तत् त्वम् असि’ या महावाक्यात गर्भित असलेल्या एकसरी संवित्तीचेच विवेचन केले आहे.

सर्व दृश्य-अदृश्य, ज्ञात-अज्ञात, व्यक्त-अव्यक्त पदार्थ परिवर्तनाचे विषय असतात. त्या सर्वांना आधार ‘सत्-चित्-आनंद’ स्वरूप असणारे एकमेव असे तत्त्व असून विविधता, नानात्व, बहुरंगाने

भरलेले सर्व विश्व त्याच तत्त्वाचे विलसन आहे. तू त्या विश्वाचाच प्रतिनिधी आहेस तुझ्यात आणि त्या विश्वात मुळात एकरसता आहे. नामरूपे त्याच तत्त्वावर भासतात. हे सर्व तुझ्या स्वत:च्या आनंदासाठी आहे. तू त्या तत्त्वात यथाक्रम प्रतिष्ठित हो आणि त्या आनंदात बुडी दे. असा उपदेश दिल्यानंतर चांगदेवांना ज्ञानदेवांनी कृतकृत्य केले. ज्ञानोपासनेचा ''विचारणा'' (परिपृच्छा) हा सोपा मार्ग असल्याचे सुचविले आणि त्या अंतिम तत्त्वाची साक्षात् अनुभूती घडवून दिली. ही गुरूची अपार कृपा असते.

⌘❖⌘

# २१.परस्परांसमोर असलेले दोन आरसे

चांगदेव । तुझेनि व्याजे । माउलिया निवृत्ति-राजें ।
स्वानुभव रसाळ खाजें । दींधले लोभे ।। ३६(६१)
एवं ज्ञानदेव चक्रपाणि ऐसे । दोन्ही डोळस आरिसे ।
परस्पर पाहता कैसे । मुकले भेदा ।। ३७(६२)

(चांगदेवा ! तुझ्या निमित्ताने निवृत्ति-माउलीने दिलेला स्वानुभवरूपी प्रसाद मी तुझा माझ्यावर लोभ आहे हे जाणून, तुला दिला. याप्रमाणे ज्ञानदेव आणि चक्रपाणी (चांगदेव), दोन डोळस आरसे जसे परस्परात पाहतांना त्यांच्यात कुठलाही भेद उरत नाही, तसे एकरूप झाले.)

चांगदेव पासष्टीची ही सांगता आहे. इथवर ज्ञानदेवांनी चांगदेवांना तू पुत्र वटेश्वराचा 'तत् त्वम् असि' हा बोध दिला होता तो चांगदेवांनी आत्मसात केल्याचा ज्ञानदेवांना प्रत्यय आला आणि दोघांनीही त्याच्या फलस्वरूप परस्परांची एकात्मता अनुभवली.

दोन स्वच्छ आरसे एकमेकांसमोर ठेवले तर कोण कोणाला पाहतो हे सांगता येत नाही. त्यांच्यात पूर्णतया अभेद असतो. तिथे पृथक् व्यक्तित्वाचा सर्वभाव विरून गेलेला असतो. सर्व उपाधी नाहीशा झालेल्या असतात. असते ती एकरूपता! गुरूचा हा प्रसाद असतो.

ज्ञानदेवांनी निवृत्तिनाथांच्या कृपेने विवेचन करून चांगदेवांच्या

मनातील सर्व संभ्रमांचा निरास केला. समाधीत जगदाभासाचा लोप होतो तेव्हा ते जगत् नाहीसे होत नाही. त्याच्या नामरूपांची जाण नसते त्या स्थितीत आत्मस्वरूपाचे प्रभुत्व असते परंतु समाधीतून उत्थान झाल्यावर नामरूपे भासू लागतात. हा सर्व एकसरी संवित्तीचाच विलास आहे. सर्व भेद आभासिक आहेत. मुळात एकच चैतन्य विलसत असते. त्या चैतन्याची प्रचिती आली म्हणजे समाधी आणि उत्थान या दोन्ही स्थितीत एकच चैतन्य विराजमान आहे अशी अनुभूती येते आणि मग या सर्व अवस्थांच्या अतीत असलेला एकात्मतेचा भाव निरंतर स्फुरत असतो. त्या स्थितीचे शब्दांकन करणे शक्य नसते कारण ती निरतिशय अशी आनंदमयी व्यापकता असते.

ज्ञानदेवांनी एकमेकांसमोर ठेवलेल्या दोन स्वच्छ आरशांचा दृष्टांत दिला आहे. दोन्ही आरशात प्रगट होणाऱ्या प्रतिमा एकमेकांच्या असतात आणि त्यांची गणना 'अनंत' (infinite) अशीच करावी लागेल. दोन शून्यांची बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार केवळ शून्यच असतो कारण या कोणत्याही प्रक्रियेच्या साचात ती स्थिती बसत नाही. तिथे कोणताही लौकिक किंवा व्यावहारिक संबंध सर्वस्वी अर्थशून्य, क्रियाशून्य असा असतो. ही जीवनमुक्ताची अवस्था असते.

ज्ञानदेवांची विलक्षण नम्रता, विनयशीलता, अहंकाररहितता व त्यांचा त्यांच्या गुरूविषयी-निवृत्तिनाथांविषयी असलेला परमोत्कट भाव या ओव्यातून ओतला आहे. ज्ञानदेवांच्या मनाची कोमलता, करूणा व प्रेम उंचबळून बाहेर येऊन दुथडी भरून वाहत आहे. या ओव्यातून जो भावस्पर्श आहे तो आपल्या काळजाचा ठाव घेणारा आहे.

गुरू-शिष्याच्या परंपरागत स्वानुभूतीचा हा विलक्षण आविष्कार आहे. इथे सर्व द्वैत मावळले आहे. चांगदेव ज्ञानदेव झाले आणि ज्ञानदेव चांगदेव झाले अशी ही अनुभूती आहे.

विश्वातील विविधता ही आनंदमयी आहे. परंतु त्या विविधतेमध्ये दडलेली एकात्मता जाणता आली तर त्या विविधतेतून शाश्वत सुखाची निर्मिती होते अन्यथा व्यावहारिक सुख:दुखाचे डोंगर पार करतांना माणसाची दमछाक होते असते. त्याला त्या निरपेक्ष आनंदाची अनुभूती येत नाही.

पूर्वसंस्कारांमुळे वासनांच्या उद्रेकामुळे अंत:करण मलीन होते. त्यामुळे बाह्य विश्वाचे रूप त्यास यथार्थतेने प्रतीत होत नाही. चांगले-वाईट, प्रिय-अप्रिय, गोड-कडू, राग-द्वेष इत्यादी द्वंद्वांनी त्या अंत:करणाचा संकोच होतो. एखाद्या डबक्यातील पाण्यासारखे ते गढूळ असते. त्यामुळे आपले रूप त्यात दिसून येत नाही. रेशमाचा कीडा आपल्याच अंगातून तंतू काढून त्याचे आपल्याभोवती घट्ट आवरण तयार करतो. ज्यावेळी त्याला त्याच्या विवशतेची जाणीव होते त्यावेळी त्या कोशातून बाहेर पडण्याचा तो प्रयत्न करतो. ही आपणच आपल्यावर लादलेली बद्धता असते. कित्येक वेळा त्या बद्धतेची जाणीव न झाल्यामुळे तो त्यातच गुदमरून मरून जातो. काही आपल्या प्रयत्नांनी त्यातून बाहेर पडतात. आपले निज-स्वरूप विशुद्ध आहे. अंत:करणात पूर्वानुभवातून निर्माण झालेले संस्कार दूर सारता येतात असे सांगणारा गुरू भेटला म्हणजे त्याला त्याच्या स्वयंप्रज्ञेचे, स्वातंत्र्याचे व स्वानंदाचे भान होते व तो सर्व बंधने तोडण्यात सफल होतो.

ज्ञानदेवांनी त्यांचे गुरू निवृत्तिनाथ यांच्या प्रसादाने चांगदेवांना हा उपदेश दिला आणि चांगदेव जीवन्मुक्त झाले. चांगदेव पासष्टी हे एक अद्भुत, प्रेरणा देणारे, दिव्य दर्शनाने पुनीत झालेले अमर काव्य आहे.

⌘❖⌘

# २२. तैसे गुंफणे ज्ञानदेवो म्हणे

तिया परी जो इया । दर्पण करील ओंविया ।
तो आत्मा एवढे या । मिळैल सुखा ।। ३८(६३)
नाही तें चि काय नेणो असे । दिसे तें चि कैसे नेणों दिसे ।
असे ते चि नेणों आपैसे । ते की होइजे ।।३९(६४)
निदे परौते निदैजणे । जागृति गिळौनि जागणे ।
केले तैसे गुंफणे । ज्ञानदेवो म्हणे ।। ४०(६५)

(याप्राणे जो कोणी या ओव्यांना पूर्णतया समजून घेईल दर्पण करील ओंविया) तो आत्म्याएवढा विशाल होईल. ज्याची कोणतीही तुलना करता येत नाही, जे एरव्ही अप्रगट आहे ते जाणले जात नाही. जे दिसते ते जाणले जाते (पण) त्याचा विसर होत नाही. जे (वस्तुत: स्वयंप्रकाशी) आहे ते (ज्ञानाचा विषय न होता स्वत:च्याच महिम्यात प्रतिष्ठित असते. ती प्रतिष्ठा हेच सर्वस्व होणे आहे.) झोप गिळून झोपणे, जागृतीचा ग्रास करून जागणे आहे. अशा प्रकारचे हे ज्ञानदेव गुंफतो.)

ज्ञानदेवांनी त्यांचा निज-भाव व्यक्त करण्यासाठी ओवीचे माध्यम निवडले. गद्य शब्दस्वरूप असते. त्यात विचार असतो, तर्क असतो, मुद्देसूद मांडणी असते. नियमित वाहणारा प्रवाह असतो. आपले स्वगत मनोविश्व प्रगट करून ते पाटवून देण्याचा हेतू असतो. त्यात सुसंगती असते परंतु कवीला स्वातंत्र्य असते. शब्दांची निवड

करतांना त्यात दुसऱ्याला आपले मनोगत पटवून देण्याचा अभिनिवेश नसतो. हृदयातून जसे अवतरले तसे तो शब्दांकन करतो. त्यात जी लय असते, वळणे असतात, जी आवर्तने असतात, जी झेप असते, त्यातून तो आपला भाव प्रगट करतो. पद्यात लालित्य असते. जिव्हाळा असतो, स्फूर्ती असते. सर्व भाव प्रगट करण्याचे विलक्षण सामर्थ्य असते. ते मनाच्या पलीकडे असणाऱ्या चेतनेला स्पर्श करते.

ज्ञानदेवांची ओवी तर प्रत्यक्ष अमृतवाणीचे आहे. त्यात काव्यातील सगळे गुण प्रकर्षाने प्रत्ययाला येतात. पण त्याशिवाय ती शांतरसाने ओथंबलेली आहे, हा तिचा विशेष आहे. ज्ञानदेवांनी कुठेही कठोर शब्द वापरल्याचे आढळत नाही. विनोबांनी ज्ञानदेवांच्या या वैशिष्ट्यांचे अतिशय सुंदर आणि मोजक्या शब्दात वर्णन केले आहे. विनोबा लिहितात, ''ज्ञान-प्रकाशनात ज्ञानदेवांशी तुलनीय पुरुष हजार बाराशे वर्षात शंकराचार्य दिसतात. पण ज्ञानदेवांच्या ज्ञान-प्रकाशनात जो सौम्यतेचा ओलावा होता तो शांकरभाष्यात आढळणारा नाही. शंकराचार्यही करुणा-समुद्र होते पण शंकराचार्यांची करुणा ही प्रखर होती आणि ज्ञानदेवांची ज्ञान-प्रभाही सौम्य आहे त्यामुळे ज्ञानदेव 'माउली' होऊ शकले. शंकर 'आचार्य' च राहिले.''

जो कोणी या ओव्यांना दर्पण - आरसा करील त्याला त्यात त्याचे विशाल बृहत् असे आपल्या आत्म्याचे स्वरूप दिसून येईल. त्याची सर्व बंधने तुटून तो निस्सीम आनंदाच्या पदाला पोचेल असे आश्वासन ज्ञानदेव देतात. असे सांगण्यात कुठेही दर्पाचा किंवा आत्मश्लाघेचा गंध नाही. आपण ज्या आनंदात निरंतर अवस्थित आहोत तोच सर्वांना अनुभवता यावा म्हणून आत्यंतिक तळमळीने, करुणेने केलेले हे विनयशील निवेदन आहे.

सनत्कुमार - नारदांच्या संवादातून छांदोग्य उपनिषदात आत्म्याचे अनिर्वचनीय स्वरूप मांडले आहे. नारदांनी सनत्कुमारांना प्रश्न विचारला,

'' आपल्या सारख्यांच्या तोंडून मी ऐकले आहे की आत्मवेत्ता शोकास तरून जातो. परंतु ''भगवः शोचामि'' (मी तर अजून शोकग्रस्त आहे.) आपण मला शोकाच्या पार करावे (सोऽहं भगवन् । तं मां भगवन् शोकं पारयितु इति) नारदांना उद्देशून सनत्कुमारांनी जो उपदेश दिला तो भौम-विद्या' म्हणून प्रसिद्ध आहे. सनत्कुमारांनी सांगितले की जो शोकमुक्त होऊ इच्छितो त्याला सत्याच्या आश्रयाने शोकापासून - दुःखापासून मुक्ती मिळू शकते. परंतु सत्याचे आचरण करण्यासाठीच निष्ठा असावी लागते आणि त्या निष्ठेतून कृती घडावी लागते. ती कृती सुखाच्या अपेक्षेनेच होते. नारदांनी विचारले, 'भगवन् मी सुख जाणू इच्छितो. (सुखं भगवो विजिज्ञासे इति) सनत्कुमार म्हणाले, ''यो वै भूमा तत् सुखम् । नाल्पे सुखमस्ति । भूमैव सुखम् । (जे विशाल आहे तेच सुख. अल्पात सुख नसते. भूमा हेच सुख.)

पूर्व संस्कारांची व वासनांची अनंतविध वलये आपण आपल्या भोवती निर्माण करतो. हा माझा, हा परका, हा माझा देह इतरांहून वेगळा, हा माझा धर्म, हा माझा पंथ, दुसरा धर्म व पंथ माझा नाही, ही माझी संपत्ती, ती दुसऱ्याची, हा माझा देश, तो दुसऱ्याचा असे एक नाही, अनंत भाव आपण जोपासतो. त्यामुळे आपण संकोचित होतो. संकोच झाल्यामुळे आपले मनोविश्व - भावविश्व उत्तरोत्तर अधिकाधिक लहान होत जात. जेव्हा आपण समग्र विश्वाचा विचार करतो तेव्हा हे सर्व भेद, वाद, श्रद्धा, विश्वास अत्यंत क्षुद्र आहेत याची प्रचिती येते. संपूर्ण विश्वाचाच आपण एक अविभाज्य घटक आहोत, आपल्याहून ते वेगळे नाही असा भाव उत्पन्न होतो. हा भाव जसजसा विस्तारित होतो तसतसा सर्वात्मकतेचा प्रकाश आपल्याला न्हाऊन काढतो. तिथे शोक, मोह, राग, द्वेष, मी आणि इतर हे सर्व भाव विरून जातात. हेच आत्यंतिक सुख किंवा आनंद होय. ते विशाल आहे. अपरिमित आहे, निरपेक्ष आहे. तोच आत्मा आहे.

ज्ञानदेव म्हणतात, ‘‘तिया परी जो इया । दर्पण करील ओविया । तो आत्म्या एवढे या । मिळैल सुखा ।। ’’ हाच भौम महिमा आहे.

लौकिक सुख-दुःखाचा भोवरा सतत फिरत असतो. त्याची आवर्तने निरंतर सुरू असतात. त्यांत ओढल्या जाणाऱ्याला सहजासहजी सुटका नाही तो आत आत फसत जातो. परंतु गुरुकृपेने जेव्हा प्रचितीं येते की, ‘हा केवळ भास आहे, तू मुळात स्वतंत्र व विशाल आहेस. तुझे निखळ स्वरूप जाणून तू बाहेर पडू शकतोस’. तेव्हा त्याची त्यातून सुटण्याची धडपड सुरू होते. ज्ञानदेव सांगतात की, जे वास्तविक भ्रमात्मक आहे. तेच खरे समजून तू चालतो, वागतो, त्यामुळे तुला जे ‘‘ नाही तेचि काय नेणे असे’’ जे वस्तुतः शाश्वत नाही, जे नश्वर आहे, त्याची नेणीव निरास, निवृत्ती किंवा विसर मुद्दाम करण्याचे कारण उरत नाही. सुखदुःख हे क्षणिक, सातत्याने बदलणारे भाव आहेत. ते आज आहेत व उद्या नाहीत त्यांना चिकटून बसण्यात हशिल नाही. परंतु आपले शुद्ध आत्म-स्वरूप अविकारी व विशाल आहे. ते सर्वव्यापक आहे हे नव्याने जाणावे लागत नाही. ते निरंतर असते. अहं-स्फुरण कधीच थांबत नाही. मला कळले कळले नाही यातही तेच स्फुरण असते.

अज्ञानाची पट्टी दूर करताच त्ते प्रतीत होते. ज्ञानदेव म्हणतात ‘‘ नाही तेचि काय नेणो असे। दिसे तेचि कैसे नेणो दिसे । असे तेचि नेणौ, आपैसे। ते की होईजे ।। हेच भौम आहे, विशाल आहे. सागरावर उठणाऱ्या तरंगांचा त्याला क्षोभ नाही. तो आपल्या महिम्यात सदैव असतोच.

असा भौम-पुरुष जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही व्यावहारिक अवस्थांच्या अतीत असतो. तो जेव्हा निजला असतो तेव्हाही त्या निद्रेची त्याला जाण असते. जेव्हा तो उघड्या डोळ्यांनी जग पाहतो,

तेव्हा त्याची वृत्ती चलित होत नाही. जगरहाटीचा हा विलक्षण स्तिमित करणारा खेळ तो वृत्ति-शून्य दृष्टीने पाहात असतो. विश्व हे एक आनंदमय क्रीडांगण आहे आणि त्यात होणाऱ्या सर्व क्रीडा या आपल्याच आनंदासाठी आहेत, याचे तो दर्शन घेतो. निद्रा आणि जागृती दोन्ही अवस्थांचा ग्रास करून तो आत्मक्रीड होतो. ज्ञानदेव म्हणतात.

''निदे परौते निदैजणे । जागृती गिळौनि जागणे ।
केले तैसे गुंफणे ज्ञानदेवो म्हणो ।।''

विनोबा या ओव्यांवर टीप देतांना लिहितात.

''नाही तेचि = ज्याची तुलना नाही, नश्वर

असे, दिसे, होइजे = सत् + चित् + आनंद 'होणे' म्हणजे भोगणे

कर्मी - अकर्मी, अकर्मी कर्म

जैसे गुंफणे = गुंफणया परौते गुंफणे

गुंफणे गिळौनि गुंफणे''

⌘❖⌘

# श्रीचांगदेवपासष्टी

स्वस्ति श्री वटेशु । जो लपोनि जगदाभासु । दावी मग ग्रासु । प्रगटला करी ।।१।। प्रगटे तंव तंव न दिसे । लपे तंव तंव आभासे। प्रगट ना लपाला असे। न खोमता जो ।।२।। बहु जंव जंव होये। तंव तंव कांहींच न होये। कांही नहोनि आहे। अवघाचि जो ।।३।। सोनें सोनेपणा उणें । न येतांचि झालें लेणें । तेंवि न वेंचतां जग होणें अंगे जया ।।४।। कल्लौळकंचुक । न फेडितां उघडें उदक । तेंवि जगेसी सम्यक् । स्वरूप जो ।।५।। परमाणूंचिया मांदिया । पृथ्वींपणें न वचेचि वायां। तेंवि विश्वस्फूर्ति इयां । झांकवेना जो ।।६।। कळांचेनि पांघुरणें । चंद्रमा हरपों नेणें । कां वह्नि दीपपणें। आन नोहे ।।७।। म्हणोनि अविद्यानिमित्तें । दृश्य द्रष्टत्व वर्ते । तें मी नेणें आइतें । एसेंचि असे ।।८।। जेंवि नाममात्र लुगडें । येऱ्हवी सूतचि तें उघडें । कां माती मृद्भांडे । जयापरी ।।९।। तेंवि द्रष्टा दृश्य दशे । अतीत दृङ्मात्र जें असे । तेंचि द्रष्टादृश्यमिसें । केवळ होय ।।१०।। अलंकार येणें नामें । असिजे निखिल हेमें । नाना अवयवसंभ्रमें । अवयविया जेंवीं ।।११।। तेंवि शिवोनि पृथ्वीवरी । भासती पदार्थांचिया परी । प्रकाशे तें एकसरी । संवित्ति हे ।।१२।। नाहीं तें चित्र दाविती । परी असे केवळ भिंती । प्रकाशे ते संवित्ति । जगदाकारें ।।१३।। बांधियाचिया मोडी । बांधा नहोनि गुळाची गोडी । तयापरी जगपरवाडी । संवित्ति जाण ।।१४।। घडियेचेनि आकारें । प्रकाशिजे जेवीं अंबरें । तेवीं विश्वस्फूर्ति स्फुरे । स्फूर्तिचि हे ।।१५।। न लिंपता सुखदुःख । येणें आकारें क्षोभोनि नावेका । होय आपणिया सन्मुख । आपणचि जो ।।१६।। तया नांव दृश्याचे होणें । संवित्त द्रष्ट्टत्वा आणिजे तेणें बिंब बिंबत्व जालेपणे। प्रतिबिंबाचेनि ।।१७।। तेंवी आपणचि आपुला पोटी। आपणया दृश्य दावित उठी । द्रष्टादृश्यदर्शन त्रिपुटी । मांडे तें हे ।।१८।।

सुताचिये गुंजे । आंत बाहेर नाहीं दुजें। तेंवी तीनपणेंविण जाणिजे । त्रिपुटीहे ।।१९।। नुसधें मुख जैंसें । देखितजसे दर्पणमिसे । वायांचि देखणें ऐसे । गमों लागें ।।२०।। तैसें न वचतां भेदा । संवित्ति गमे त्रिधा । हेंचि जाणे प्रसिद्धा । उपपत्ति इया ।।२१।। दृश्याचा जो उभारा । तेचि द्रष्ट्टत्व होय संसारा । या दोहीं माजिला अंतरा । दृष्टि पंगु होय ।।२२।। दृश्य जेधवां नाहीं । तेधवा दृष्टि घेऊनि असे काई? । आणि दृश्येंविण कांही । द्रष्टत्व असे ? ।।२३।। म्हणौनि दृश्याचे जालेपणें । दृष्टि दृष्टत्व होणें । पुढती तें गेलिया जाणें । तैसेचि दोन्ही ।।२४।। एवं एकचि झाली ती होती । तिन्ही गेलिया एकचि व्यक्ति । तरी तिन्ही भ्रांति । एकपण साच ।।२५।। दर्पणाच्या आधीं शेखीं । मुख असतचि असे मुखीं । माजी दर्पण अवलोकी । आन कांहीं होये? ।।२६।। पुढें देखिजें तेणें बगें । देखतें ऐसें गमों लागे । परी दृष्टीतें वाउगें । झकवित असे ।।२७।। म्हणौनि दृश्याचिये वेळे । दृश्यद्रष्टत्वावेगळें । वस्तुमात्र निहाळे । आपणापाशीं ।।२८।। वाद्यजातेंविण ध्वनी । काष्ठजातेविण वन्ही । तैसें विशेष ग्रासुनी । स्वयेंचि असे ।।२९।। जें म्हणतां नये कांही । जाणों नये कैसेही । असतचि असे पाही । असणें जया ।।३०।। आपुलिया बुबुळा । दृष्टि असोनि अखम डोळा । तैसा आत्मज्ञानीं दुबळा । ज्ञानरुप जो ।।३१।। जें जाणणेंचि कीं ठाईं । नेणणें कीर नाहीं । परी जाणणें म्हणोनियांही । जाणणें कैचें ।।३२।। यालागीं मौनेंचि बोलिजे । कांहीं नहोनि सर्व होइजे । नव्हतां लाहिजे । कांहींच नाहीं ।।३३।। नाना बोधाचिये सोयरिके । साचपण जेणें एकें । नाना कल्लोळमाळिके । पाणी जेवीं ।।३४।। जे देखिजतेविणे । एकलें देखतेपण । हें असो आपणिया आपण । आपणचि जे ।।३५।। जें कोणाचें नव्हतेनि असणें । जें कोणाचे नव्हतां दिसणें । कोणाचें नव्हता भोगणें । केवळ जो ।।३६।। तया पुत्र तूं वटेश्वराचा । रवा जैसा कापुराचा । चांगया मज तुज आपणयाचा । बोल ऐके ।।३७।। ज्ञानदेव म्हणजे । तुज माझा बोल ऐकणें । ते तळहातातळीं मिठी देणें ।

जयापरी ।।३८।। बोलेंचि बोल ऐकिजे । स्वादेंचि स्वाद चाखिजे । कीं उजिवडे देखिजे । उजिडा जेवीं ।।३९।। सोनिया वरकल सोनें जैसा । कां मुख मुखा हो आरिसा । मज तुज संवाद तैसा । चक्रपाणि ।।४०।। गोडिये आपुली गोडी । घेतां काय न माय तोंडीं । आम्हां परस्परें आवडी । तो पाडु असे ।।४१।। सखया तुझेनि उद्देशें । भेटावया जीव उल्हासे । कीं सिद्धभेटी विसकुसे । ऐशिया बिहे ।।४२।। घेवों पाहें तुझे दर्शन । तंव रूपा येवों पाहे मन । तेथें दर्शना होय अवजतन । ऐसें गमों लागें ।।४३।। कांहीं करी बोले कल्पी । कां न करी न बोले न कल्पी । ये दोन्ही तुझ्या स्वरुपीं । न घेति उमसू ।।४४।। चांगया तुझेनि नांवें । करणे न करणें न व्हावें । हें काय म्हणों परी न धरवे । मीपण हें ।।४५।। लवण पाणियाचा थावो । माजी रिघोनि गेलें पाहो । तंव तेंचि नाहीं मा काय घेवो । माप जळा ।।४६।। तैसें तुज आत्मयाते पाही । देखो गेलिया मीचि नाहीं । तेथें तूं कैचा काई । कल्पावया जोगा ।।४७।। जो जागोनि नीद देखें । तो देखणेपणा जेंवी मुके । तेवी तूंतें देखोनि मी ठाकें । कांहीं नहोनि ।।४८।। आंधाराचे ठायी । सूर्यप्रकाश तंव नाहीं । परी मी आहे हें कांहीं । नवचेंचि जेंवी ।।४९।। तेंवीं तूंतें मी गिवसी । तेथें तूंपण मी पणेंसी । उखतें पडे ग्रासीं । भेटीचि उरे ।।५०।। डोळयाचे भूमिके । डोळा चित्र होय कौंतुकें । आणि तेणेंचि तो देखे । न डंडळितां ।।५१।। तैसी उपजतां गोष्टी । न फुटतां दृष्टी । मीतूंवीण भेटी । माझी तुझी ।।५२।। आतां मी तूं या उपाधी । ग्रासूनि भेटी नुसधी । ते भोगिली अनुवादी । घोळघोळूं ।।५३।। रुचतियाचेनि मिसें रुचितें जेविजे जैसे । कां दर्पणव्याजे दिसे । देखते जेवि ।।५४।। तैसीं अप्रमेयें प्रमेयें भरलीं । मौनाची अक्षरें भली । रचोनि गोष्टी केली । मेळियेचि ।।५५।। इयेते करूनि व्याज । तूं आपणयातें बूझ । दीप दीपपणें पाहे निज । आपुलें जैसें ।।५६।। तैसी केलिया गोठी तया उघडिजे दृष्टी । आपणिया आपण भेटी । आपणामाजी ।।५७।। जालिया प्रळयीं एकार्णव। अपार पाणियाची धांव । गिळी

आपुला उगव । तैसें करी ॥५८ ॥ ज्ञान देव म्हणे नामरूपें - । विण तुझें साच आहे आपणपें । ते स्वानंद - जीवनपें । सुखिया होई ॥५९॥ चांगया पुढतपुढती । घरा आलिया ज्ञानसंपत्ति । वेद्यवेदकत्वही अतीतीं । पदीं बेंसें ॥६०॥ चांगदेवा तुझेनि व्याजें । माऊलीया श्रीनिवृति राजैं । स्वानुभव रसाळ खाजे । दिधलें लोभे ॥६१॥ एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे । दोन्ही डोळस आरिसे । परस्पर पाहतां कैसे । मुकले भेदा ॥६२॥ तियेपरी जो इया । दर्पण करील ओंविया । तो अत्माएवढिया । मिळेल सुखा ॥६३॥ नाहीं तेंचि काय नेणों असे । दिसे तेंचि कैसें नेणों दिसे । असे तेंचि नेणों आपैसे । ते कीं होइजे ॥६४॥ निदेपरौते निदैजणें । जागृति गिळोनि जागणें । केले तैसें गुंफणें। ज्ञानदेवो म्हणे ॥६५॥

॥ श्रीचांगदेवपासष्टी समाप्त ॥

॥ श्रीविठ्ठलार्पणमस्तु ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ श्रीगुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥

⌘❖⌘